# जमखंडी संस्थान

(उत्पत्ती–स्थिती–लय)

म. द. खाडिलकर

# जमखंडी संस्थान

## (उत्पत्ती–स्थिती–लय)

लेखक
**म. द. खाडिलकर**

या पुस्तिकेचे पुनर्मुद्रण श्री. अच्युत शं. आपटे
यांनी साप्ताहिक मुद्रण, पुणे येथे छापून घेतले. नोव्हें. ९८

## प्रास्ताविक

इ. स. १८१८ मध्ये शनिवारवाड्यावरील भगवा झेंडा उतरवून ब्रिटिशांचे युनियन जॅक चढविण्यात आले आणि भारतावरील स्वराज्याचे छत्र कोसळून पडले! भारतीय जनता अक्षरश: पोरकी झाली! तिचे कपाळी दास्य आले!! कुटुंबाचा पोशिंदा कर्ता पुरुष अकस्मात् कालवश व्हावा म्हणजे मागे राहिलेल्या कच्च्या–बच्च्यांची काय अवस्था होते? विशेषत: अशा कच्च्या–बच्च्यांना मायेचे, आपुलकीने सांभाळणारे कोणी माणूस नसले तर त्यांच्यावर परांगदा होण्याची जशी पाळी येते तशीच अवस्था भारतीयांची झाली. दैववशात् ज्या परछत्राखाली जीवन कंठण्याचे नशिबी आले त्यात कसेबसे जगण्यावाचून गत्यंतर नव्हते. कोणाच्या नशीबी सरळसरळ ब्रिटिशांचे दास्य आले, तर कोणाच्या नशिबी आपल्याच रक्तामांसाच्या परंतु ब्रिटिशांच्या दासानुदास संस्थानिकांचा आश्रय आला. भारतीय जनता याप्रमाणे वेगवेगळ्या राज्यकारभाराखाली विभागली गेली. तिची प्रगती-अधोगती या वेगवेगळ्या राज्यकारभारांच्या उद्दिष्टांशी व मार्गाशी निगडित झाली. भारतीय जनजीवनाला याप्रमाणे वेगवेगळ्या दिशा प्राप्त झाल्या. नव्या गुंतागुंती, नवी आकर्षणे, नव्या समस्या या भिन्नभिन्न स्वरूपांत त्या त्या विभागातील जनतेला दर्शन देऊ लागून भारतीय जनतेच्या जीवनसरितेचा अखंड वाहता राहणारा प्रवाह या वेगवेगळ्या राजकीय विभागांनी खंडित झाला. परांगदा झालेल्या अज्ञान कच्च्या–बच्च्यांना वेगवेगळ्या मनोवृत्तीच्या माणसांचा आश्रय पत्करावा लागला, तर त्यांच्या भावी जीवनावर नाही का वेगवेगळे ठसे उमटत? जवळजवळ तशीच स्थिती या भारतमातेच्या पोरक्या लेकरांना प्राप्त झाली असे म्हणण्यास काही हरकत नाही.

तथापि, अशाही असाधारण परिस्थितीत भारतीय जनतेने आत्मोन्नतीचा, दास्यविमोचनाचा प्रयत्न शक्य त्या साधनांनिशी चालू ठेवला. बलोपासना केली, संघटना निर्माण केली आणि आपल्या भवितव्याचे धनीपण आपल्याच हाती घेण्यासाठी प्रयत्नांची पराकाष्टा केली. १८१८ साली वर चढलेले युनियन जॅक १५ ऑगस्ट १९४७ रोजी खाली उतरविले गेले आणि भारतीय स्वातंत्र्याचे प्रतीक असा अशोक चक्रांकित तिरंगी ध्वज दिल्लीवर फडकला! भारतीय जनतेने स्वराज्य - छत्र पुन्हा उभे केले. स्वातंत्र्याच्या या नव्या झंझावाताने ब्रिटिश राजवटीत खालसा व संस्थानी मुलुख असे निर्माण झालेले बांध भराभरा फोडून नाहीसे केले आणि भारतीय जीवनसरितेचा वेगवेगळ्या विभागांत कोंडून राहिलेला हा प्रवाह पुन्हा मूळ प्रवाहात विलीन झाला.

इतिहासाच्या या घटनांचा अभ्यास हा बराच बोधप्रद आहे. भारतासारखा अफाट परंतु नि:शस्त्र देश, त्यात पुन्हा साऱ्या भारतीय जनतेचे ऐक्य अशक्य करून

टाकून संघटनात्मक सामर्थ्य निर्माण होण्यास अडचण उत्पन्न करणारे हे वेगवेगळ्या राजवटीखालील जनतेचे विभाजन आणि दुसरीकडे अद्ययावत शस्त्रसामग्रीने युक्त असे त्रिभुवनव्यापी प्रचंड ब्रिटिश साम्राज्य. यांच्यातील लढा कसा विकसित होत गेला आणि अखेर ब्रिटिश साम्राज्याला येथून काढता पाय कसा घ्यावा लागला याचा इतिहास सर्वच दृष्टींनी विविधतापूर्ण व रोमहर्षक असाच आहे. ब्रिटिश राजवटीने स्वातंत्र्याच्या मार्गात निर्माण केलेल्या वेगवेगळ्या समस्यांना न जुमानता भारतीय जनतेने त्यांना तोंड कसे दिले यातून शिकण्यासारखे बरेच आहे. या इतिहासाच्या अभ्यासातून भारतीय रक्तामांसाच्या सहासातशे संस्थानिकांनी भारतीय पारतंत्र्याच्या काळात आपल्या आश्रयाखाली असलेल्या सात कोटी जनतेच्या पालकत्वाची जबाबदारी कशाप्रकारे पार पाडली आणि भारतीय स्वातंत्र्य संपादनानंतर भारतमातेचा हा ठेवा पुन्हा भारतमातेस कोणत्या रीतीने परत केला याचे दर्शनही होणार आहे. हा ठेवा ज्यांनी कीर्तिप्रद रीतीने परत केला त्याचे यशोगान गाण्याची संधी जशी यातून निर्माण होणार आहे, तसेच ही कीर्तिप्रदता संपादन करणे ज्यांना शक्य झाले नाही त्यांच्या असमर्थतेचे कारणही अभ्यासावयास मिळून पुढील पिढीस बोध देणारे व मार्गदर्शक असे ठरणार आहे.

हा अभ्यास परिपूर्ण रीतीने व्हावयाचा तर प्रत्येक संस्थानाचा असा इतिहास उपलब्ध असणे आवश्यकच ठरेल. पिंडेपिंडे मतिर्भिन्नः या उक्तीप्रमाणे जितकी संस्थाने व जितके राजे, तितक्या विविध राजवटी व तितके विविध अनुभव!! या अनुभवातील एक अनुभव, या विविध इतिहासांतील एक भाग अभ्यासणे हाच या लेखनामागील उद्देश आहे.

## दक्षिणी संस्थानांतील एक

जमखंडी संस्थान हे दक्षिणी संस्थाने म्हणून प्रसिद्ध असलेल्या १८ संस्थानांच्या गटातील एक संस्थान होते. सामान्यत: हिंदी संस्थानांतील प्रागतिक गटांत मोडेल असा हा दक्षिणी संस्थानांचा गट होता. सदर गटात जमखंडी, सांगली, मिरज, बुधगाव व कुरूंदवाड ही पाच संस्थाने पटवर्धन संस्थाने म्हणून प्रसिद्ध होती. साऱ्या दक्षिणी संस्थानांत प्रजापक्षीय चळवळीचे धुरीणत्व स्वीकारण्यास जसे औंध, सांगली, मिरज या संस्थानांनी माणसे पुरविली, तसेच जमखंडीने कै. अनंत वासुदेव साबडे यांच्यासारखा नेता या चळवळीस १९४२ नंतर मिळवून दिला. भारतीय स्वातंत्र्यप्राप्तीनंतर लहान संस्थानांच्या अस्तित्वाची विफलता चाणाक्षपणे जाणून घेऊन स्वत:च्या संस्थानाचे विलिनीकरण करून इतर सर्वांना योग्य मार्गदर्शन करणारा राजाही जमखंडी संस्थानानेच मिळवून दिला. याप्रमाणे दक्षिणी संस्थानांच्या इतिहासात एक वैशिष्ट्यपूर्ण स्थान जमखंडीने मिळवून ते अजरामर केले असल्याने त्याचा इतिहास जाणून घेण्याची उत्सुकता जिज्ञासूंस सतत भासण्यासारखी असल्याने या इतिहासाचे महत्त्व सहजच नजरेत भरेल.

## जमखंडी संस्थानाचा विस्तार

विस्ताराच्या दृष्टीने सत्तर खेडी, अकरा मजरी, व तीन लहान शहरे एवढ्याने युक्त असलेले ५२४ चौरस मैल क्षेत्रफळाचे व १,२६,२७२ लोकसंख्या भरेल एवढे छोटे म्हणजे एका तालुक्याएवढे हे संस्थान होते. जमखंडी, बन्हट्टी व कुंदगोळ हीच काय ती तीन शहरे! कुंदगोळास रेल्वे स्टेशन आहे. जमखंडी व बन्हट्टी या दोन्ही शहरांना जवळचे रेल्वे स्टेशन म्हणजे कुडची. येथून मोटारीने दोन्ही शहरांस जाता येते. राज्यकारभाराच्या सोयीच्या दृष्टीने याचे जमखंडी व कुंदगोळ असे दोन तालुके पाडण्यात आले होते. त्या खेरीज वाठार, पाटखळ व ढवळपुरी ही तीन ठाणी होती. जमखंडी तालुका बेळगाव जिल्ह्याच्या पूर्वेस पसरला असून, या तालुक्यामधून श्रीकृष्णा नदी पश्चिमेकडून वाहत जाते. त्या अनुरोधाने या तालुक्याचे जमखंडी व सावळगी असे दोन विभाग पाडण्यात आले होते. कुंदगोळ तालुका धारवाड जिल्ह्यातील हुबळीच्या दक्षिणेस पसरला असून, जमखंडीपासून सुमारे १२० मैलांवर आहे. वाठार, पाटखळ व ढवळपुरी ही ठाणी अनुक्रमे सातारा, सोलापूर व नगर जिल्ह्यांत आहेत. यावरून असे दिसून येईल की, या संस्थानचा प्रदेश सलग असा नव्हता. एवढेच नव्हे; तर परस्परापासून फार दूर अंतरावर यातील

प्रदेश असून, संस्थानी प्रजाजन बहुभाषिक व वेगवेगळ्या सांस्कृतिक वातावरणात वावरत होते. संस्थानाच्या प्रजाजनांतही एकजीवता नांदणे किंवा काही काही महत्त्वाच्या प्रश्नांबाबत सर्वांना सारखेच आकर्षण वाटणेही यामुळे निसर्गत:च अशक्य होते.

## हवामान, पीकपाणी व उद्योग

संस्थानाच्या सर्व भागांत काही थोडी माळजमीन सोडली, तर बहुतेक सर्व जमीन काळी आहे. संस्थानातील ३,१२,३२५ एकर जमीन लागवडीखाली होती. २७,१६० एकर ३४ गुंठे एवढे जंगलाचे क्षेत्र होते. जोंधळा, गहू व कापूस ही संस्थानाची मुख्य पिके होती. या खेरीज ऊस, केळी, मिरच्या यांचे पीक चांगले होते. या संस्थानाच्या प्रदेशातील जनतेचा मुख्य धंदा शेतीचा असला, तरी व्यापाराच्या व उद्योगधंद्याच्या दृष्टीने जमखंडी, बन्हट्टी, आसंगी व आसपासच्या खेड्यांतून सूत काढणे, रंगविणे व लुगडी तयार करणे वगैरे धंदे बऱ्याच मोठ्या प्रमाणावर चालतात. सर्व संस्थानांत एकंदरीने ४००० माग असावेत असा अंदाज आहे.

या संस्थानातील जमखंडी तालुक्याचे हवामान उष्ण आहे. कुंदगोळचे समशीतोष्ण आहे. पाऊस सरासरीने १० ते २० इंचांपर्यंत पडतो. उष्णतेचे मान जास्तीतजास्त ११०° ते ११२°F पर्यंत चढते.

## ऐतिहासिक पार्श्वभूमी

या संस्थानाचा थोडासा भाग महाराष्ट्रात व बराचसा भाग कर्नाटकात मोडत असल्याचे वर आलेच आहे. त्यामुळे महाराष्ट्राच्या व कर्नाटकाच्या प्राचीन इतिहासात जी राजकीय स्थित्यंतरे झाली, त्यातून हा मुलुख गेलेला आहे. चालुक्य, राष्ट्रकूट, यादव, विजयनगरकर, बहामनीराज्ये, विजापूरची अदिलशाही, मराठेशाही या सर्व राजवटी या मुलुखावर अंमल गाजवून गेल्या आहेत. कोणूरच्या देसायांचा अंमलही जमखंडीच्या भागावर होता. कुंदगोळ भागात हैदर, टिपू, सावनूरकर नबाब यांनी आपला अंमल बसविला होता. पेशवाईत पटवर्धन सरदारांनी या भागातील सर्व बंडाळी मोडून आपला अंमल त्यावर बसविला. याप्रमाणे भौगोलिक व ऐतिहासिक परिस्थितीने युक्त असलेला हा प्रदेश पटवर्धन घराण्याचे अंमलाखाली आला.

या इतिहासप्रसिद्ध पटवर्धन राजघराण्याचा मूळपुरुष रत्नागिरी जिल्ह्यातील कोतवड्याचे ब्रम्हीभूत हरभट बिन बाळंभट पटवर्धन हे होत. श्रीगणपतीचे दृष्टांतामुळे ते देशावर आले व त्यांनी इचलकरंजीकरांचा मूळपुरुष नारो महादेव जोशी याचे उपाध्येपण मिळविले. हरभटजींना एकूण सात पुत्र. त्यांपैकी सहावे श्री. रामचंद्रहरि यांनी

१७३७ साली वसईच्या मोहिमेत चिमाजी आप्पा यांचे नेतृत्वाखाली मर्दुमकी गाजविल्याने त्यांना २४० स्वारांचे खासगीपथक त्यांचे नावे करून देऊन त्यास सरदारकीची वस्त्रे व पोषाख देण्यात आले. सदर रामचंद्रहरि यांचे चिरंजीव हेच इतिहासप्रसिद्ध परशुरामभाऊ पटवर्धन होत. त्यांनी आपल्याला बापसे बेटा सवाई म्हणवून घेतले. एवढेच नव्हे तर मराठी सेनापतींच्या मालिकेत अग्रेसरत्व मिळवून पटवर्धन घराण्याचे नाव अजरामर करून टाकले. भाऊसाहेब १७४०त जन्मले. सन १७७४ साली नारायणराव पेशवे यांनी हरभटजींचे चौथ्या चिरंजीवांचे पुत्र श्री. वामनगोविंद, तिसऱ्या चिरंजीवांचे नातू श्री. रघुनाथ नीलकंठ व श्री. परशुरामभाऊ या त्रिवर्ग सरदारांत ८,००० स्वारांची सरदारी व एकूण वीस लक्ष अठ्ठावन हजार एकशेचा सरंजाम नेमून देऊन त्रिवर्गाच्या नावे नवी सनद करून दिली. या वेळी हे त्रिवर्ग सरदार जरी विभक्त झाले नव्हते, तरी ते मिरज, कुरुंदवाड व तासगाव येथे आपापल्या सोयीप्रमाणे राहत असत.

श्रीमंत भाऊसाहेब सन १७९९त पट्टणकुडीचे लढाईत पडले. त्या वेळी त्यांना रामचंद्रराव, हरिपंत, माधवराव, गणपतराव व विनायकराव असे पाच पुत्र होते. त्यांपैकी दुसरे हरिपंत निपुत्रिक मरण पावले. आणि पाचवे पुत्र लहानपणीच देवाधीन झाले. इ. स. १८११-१२ साली पेशवे सरकारांनी भाऊंच्या जहागिरीचे हिस्से करून दिले. माधवराव यांनी हिस्सा घेण्याचे नाकबूल केले. म्हणून जमखंडी व तासगाव असे दोनच हिस्से केले. रामचंद्रराव यास जमखंडी– रु. ४,५४,१००, स्वार १,२८० व गणपतराव यास तासगाव– रु. २,०८,७७६, स्वार ६४० असे हिस्से केले. माधवराव यांचा हिस्सा जमखंडीत सामील झाला.

## पहिले अधिपती : परशुरामभाऊंचे चिरंजीव रामचंद्रराव

याप्रमाणे परशुरामभाऊंचे चिरंजीव रामचंद्रराव हेच जमखंडीचे पहिले अधिपती होत. परंतु परशुरामभाऊ यांनीच जमखंडीस किल्ला बांधवून १७७५ साली भास्करपंत नाना सखदेव यांना कमाविसदार म्हणून नेमले. त्यावेळी कोणूर देसायांचे अंमलात काटकाई फार असे, असे म्हणतात. कोणी अंमलदार आल्यास न जुमानता त्यांची ते लोक पायमल्ली करीत व समयी त्याचा प्राणही घेत असा त्यासंबंधी बोभाटा असे. याचा बंदोबस्त भास्करपंत नाना सखदेव यांनी केला. त्यांनी कोणूरास काडप्पा देसाई यांच्याशी लढाई करून मोठ्या युक्तीने व चातुर्याने अडीचशे काटक प्यादे जमखंडीस धरून आणून कैद केले व त्यांची दावण बांधून किल्ल्याच्या दक्षिणेकडील मैदानात त्यांची कत्तल उडविली व आपला अंमल पूर्णपणे बसविला असे म्हणतात. पुढे १७९९ मध्ये काडप्पाच्या मरणानंतर त्याचा धाकटा भाऊ गदगेप्पा व कारकून नरसोकृष्ण यांनी जगदाळ वगैरे ठाणी घेतल्यावेळी भास्करपंतांनी जगदाळास जाऊन

छापा घालून नरसो व दीडशे लोक ठार मारले आणि अशा रीतीने या भागात त्याने आपला अंमल बसविला असे म्हणतात. (पाहा - रामचंद्रराव आप्पासाहेबांचे फाटक रचित चरित्र. पान १०-११)

श्रीमंत रामचंद्रराव यांच्या वाट्यास वरीलप्रमाणे जमखंडीचा हिस्सा वाटणीत आल्यावेळी येथील किल्ल्यांची व्यवस्था भास्करपंत नाना यांचा मुलगा पांडोबा तात्या सखदेव याचेकडे होती. त्याने रामचंद्रराव यांना किल्ल्यात प्रवेश करण्यास प्रतिबंध केला. तेव्हा रामचंद्ररावांनी किल्ल्यापासून सुमारे पाऊण मैल अंतरावर असलेल्या जोगीमर्डी नावाच्या टेकडीवरून तोफा डागल्या. तेव्हा पांडोबा घाबरून रामचंद्ररावांना शरण आला. तेव्हा त्यास जीवदान देऊन सोडून देण्यात आले आणि रामचंद्रराव किल्ल्यात राहू लागले. काही दिवस राज्यकारभार पाहून ते १८१३ मध्ये निवर्तले. वडिलांप्रमाणे तेही मोठे शूर व पराक्रमी होते.

## दुसरे अधिपती : गोपाळराव रावसाहेब

श्री. रामचंद्रराव यांच्या निधनसमयी त्यांचे पुत्र श्रीमंत गोपाळराव तथा रावसाहेब हे १४ वर्षांचे होते. त्यांच्या कारकिर्दीत सन १८२१ साली मे. चँपलिन साहेबांनी माधवरावांचे पुत्र गोविंदराव यांनी आपला हिस्सा मागितल्यावरून जमखंडी जहागिरीचे दोन भाग केले. गोपाळरावाकडे २,४३,४७६ रुपयांचा सरंजाम ठेविला आणि गोविंदराव याजकडे २,२५,१५३ रुपयांचा सरंजाम दिला. गोविंदराव पुढे चिंचणीस राहू लागले म्हणून त्यांस चिंचणीकर म्हणू लागले.

पेशवाई बुडाल्यावर जमखंडीकर गोपाळराव यांचेशी कंपनी सरकारचा तहनामा झाला. त्यात नोकरीबद्दल स्वारांची संख्या तीनशे ठरवून जातीची नवी तैनात तीस हजार रुपयांची इंग्रज सरकारनी दिली. श्रीमंत गोपाळराव रावसाहेब यांनी राज्यकारभार अत्यंत दक्षतेने हाकून इंग्रज सरकारकडून वाहवा मिळविली. त्यांच्या राज्यकारभार कुशलतेवर संतुष्ट होऊन इंग्रज सरकारने तासगावकर भाऊसाहेब सज्ञान होईपर्यंत तासगाव संस्थानाचा कारभार रावसाहेबांकडे सोपविला. तेथेही त्यांनी चांगला लौकिक संपादन केला होता. खर्चाचे कामी ते काटकसरी होते. त्यांनी आपल्या मातोश्रींची तुळा रुपये घालून केली व त्यात पाच सोन्याच्या पुतळ्या शास्त्रासाठी घातल्या होत्या!! ते चाणाक्ष, दूरदर्शी जसे होते, तसेच बुद्धिमान असून आठवणीचे खंबीर होते. मरणसमयी त्यांची तुळा करविली. तुळेचा संकल्प करविताना ब्राह्मणांकडून काही चूक झाली होती. त्यास उद्देशून रावसाहेब मध्येच उंहूं म्हणाले. तेव्हा घडलेली चूक दुरुस्त करून संकल्प पुरा करण्यात आला. मरणसमयीसुद्धा त्यांची स्मरणशक्ती किती धड होती त्याचा हा पुरावा होय. सन १८४०त ते मरण पावले. मरणाचे आधी एक दिवस त्यांनी आसंगी येथील यादवाडकर घराण्यापैकी अंताजी माधवराव

ऊर्फ तात्यासाहेब यादवाडकर यांचा मुलगा गणपती यास दत्तक घेतले व त्याचे नाव रामचंद्रराव आप्पासाहेब असे ठेवले. दत्तकसमयी मुलाचे वय सात वर्षांचे होते. गोपाळराव रावसाहेब यांच्या दूरदर्शीपणाचे आणखी एक उदाहरण म्हणून सन १८२६ मध्येच पुढे अडचणी उत्पन्न होऊ नयेत म्हणून इंग्रज सरकारकडून दत्तकाची परवानगी व दत्तकाकडे दौलत चालविण्यात येईल असे लेखी आश्वासन घेऊन ठेवले होते. गोपाळराव रावसाहेब यांच्या निधनाने भाऊसाहेबांची औरस संतती बुडाली हे दाखविण्याकरिताच की काय, तासगाव येथे भाऊसाहेबांनी बांधविलेल्या गणपतीच्या देवालयाचे गोपुरातून त्याच वेळी धुराचे लोट चालले असे म्हणतात!

## अज्ञानावस्थेतील मातोश्री राधाबाई साहेबांचा कारभार

गोपाळराव रावसाहेबांच्या निधनानंतर त्यांचे दत्तक पुत्र श्रीमंत रामचंद्रराव आप्पासाहेब हे केवळ सात वर्षांचे असल्यामुळे मातोश्री श्रीमती राधाबाई ताईसाहेब यांना पूर्वीचे खासगी व दौलतीकडील कारभारी अनुक्रमे श्री. विठ्ठल गोविंद आपटे व कृष्णाजी बाळाजी जोशी यांच्या मदतीने संस्थानांचा कारभार पाहण्यास इंग्रज सरकारकडून परवानगी मिळाली. श्रीमती राधाबाई ताईसाहेब या साध्या, भोळ्या व शुद्धांत:करणाच्या असून आपल्या स्त्रियांच्या धर्माप्रमाणे चालण्यात निरंतर रत अशा असत. त्यांना बाहेरचे डावपेच काही एक माहिती नव्हते. दोघेही मदतनीस कारभारी हे विश्वासपात्र आणि दक्ष आहेत असा त्यांचा लौकिक त्यांनी गोपाळराव रावसाहेबांच्या तोंडून ऐकला होता व त्यांचा स्वत:चा अनुभवही तसाच होता. त्यामुळे बाहेरील परका कारभारी न मागता या दोघा कारभाऱ्यांच्या विचारे त्यांनी आपल्या बुद्धीप्रमाणे आठ–नऊ वर्षे कारभार हाकला. पुढे या दोघा मंत्र्यांच्याबद्दल त्यांचा कारभार अन्यायी व उधळा आहे, अशा प्रकारच्या कागाळ्या त्या वेळचे पोलिटिकल एजंट मे. अँडरसन यांच्यापर्यंत काही लोकांकडून गेल्या व त्याबद्दल एजंटाचा रिपोर्ट होऊन इंग्रज सरकारतर्फे विनायक कृष्ण पंडित यांना कारभारी नेमण्यात येऊन श्रीमती राधाबाई ताईसाहेब यांच्या हातची अधिकारसूत्रे काढून घेण्यात आली. त्यांना दरसाल सहा हजारांची नेमणूक करून दिली. आपटे व जोशी या दोघाही कारभाऱ्यांवर पुढे काम चालून आपटे यांना तीन वर्षे कैद व वीस हजार दंड अशी शिक्षा झाली व जोशी यांना निर्दोषी ठरवून सोडून देण्यात आले. श्रीमती राधाबाई ताईसाहेब पुढे श्रीक्षेत्र कल्हळ्ळी येथे काही वर्षे व पुढे काही वर्षे हिप्परगी येथे हरिहरि करीत राहिल्या. पुढे रामचंद्रराव आप्पासाहेब यांना मुखत्यारी मिळाल्यावर त्यांनी त्यांना मोठ्या सन्मानाने पुन्हा जमखंडीस आणले.

विनायक कृष्ण पंडित यांनी कारभारीनात्याने २६ मे १८४९ पासून ७ जानेवारी १८५३ पर्यंत राज्यकारभार उत्तम रीतीने पाहिला असे म्हणतात.

## तिसरे अधिपती : रामचंद्रराव आप्पासाहेब

ता. ७ जानेवारी १८५३ रोजी म्हणजे वयास १९ वर्षे पूर्ण होऊन विसावे वर्ष लागल्यानंतर श्रीमंत रामचंद्रराव आप्पासाहेब यांना मुखत्यारी मिळाली. त्यांनी एकंदर चवेचाळीस वर्षे राज्यकारभार केला. त्यांच्या शिक्षणाची व्यवस्था मातोश्री राधाबाई साहेब व इंग्रज सरकार यांनी उत्तम प्रकारे ठेवली होती. त्याचा त्यांनी उत्तम प्रकारे उपयोग करून घेऊन आपल्या अंगच्या गुणांचा चांगला विकास करून घेतला. त्यांची सदसद्विवेक बुद्धी, विनय, धाडस, समयसूचकता, विलक्षण तेज इत्यादि अनेक गुण या शिक्षणाने त्यांच्या अंगी चांगलेच विकास पावले होते. राजेरजवाड्यांच्या चालीरीती व राज्यकारभाराचे ज्ञान त्यांनी उत्तम प्रकारे संपादन केले होते. घोड्यावर बसणे, भाला, बोथाटी, निशाण मारणे वगैरे मर्दानी कलांतही ते तरबेज झाले होते. राज्यकारभारातील हिशेबीपणा त्यांना पूर्ण ज्ञात झालेला होता. ज्ञानाची लालसा व ते संपादन करण्याची त्यांची धडपड विलक्षण होती. गायन–वादनादी कलाही त्यांना चांगल्या अवगत होत्या. या सर्व आवडीनिवडींमुळे त्यांचा नाना प्रकारच्या कलाविदांना व कलात्मक वस्तूंना चांगला आश्रय असे. नाना गुणीजनांचे ते आश्रयदाते होते. धर्मभक्ती व साधुसंतांच्या सहवासाची ओढही तशीच विलक्षण होती. त्यांची कारकीर्द जितकी दीर्घकाळ टिकली, त्याहून दीर्घकाळ त्यांच्या कीर्तिचा परिमळ दरवळत राहिला आहे. अखिल भारताच्या इतिहासात अशोक, अकबरांना जे स्थान आहे त्याहून अधिक मोठे स्थान जमखंडीच्या इतिहासात त्यांना प्राप्त होऊन बसले आहे. व्यक्ती व राजा या दोन्ही दृष्टींनी त्यांचे स्थान अनन्यसाधारण आहे.

अडलेल्या बाळंतिणी त्यांच्या तीर्थाने मोकळ्या होत, असा त्यांचा लौकिक होता. त्याचा अनुभव श्री. गुरुदेव रानडे यांच्या जन्माचे वेळी खुद्द त्यांच्या मातोश्रींनाच आला आणि त्यांचे तीर्थ प्राशन केल्यावरच गुरुदेवांचा जन्म होऊन त्यांची सुटका झाली, ही हकिगत सर्वज्ञातच आहे.

## सत्तावनच्या क्रांतियुद्धाची झळ

त्यांच्या राज्यारोहणानंतर अवघ्या पाचच वर्षांत हिंदुस्थानात पहिल्या क्रांतियुद्धाची, स्वातंत्र्ययुद्धाची, १८५७ च्या बंडाची ज्वाला भडकली आणि त्याची झळ त्यांना लागून संशयावरून त्यांना बेळगाव व वेंगुर्ले येथे ८-१० महिने धरून नेले होते. परंतु अनेक प्रकारे चौकशी करूनही त्यांचा याशी काही संबंध नाही अशी खात्री इंग्रज सरकारची झाली आणि त्यांना मुक्त करण्यात आले. क्रांतिवीर छट्टूसिंग यांनी सर्व जबाबदारी आपणावर घेतल्याने त्यांना मात्र फाशी देण्यात आले! जमखंडीच्या प्रजाजनांची भावना मात्र अशी की, छट्टूसिंगच्या आत्माहुतीने जमखंडी संस्थानाला

जीवदान मिळाले!!

या धामधुमीत जमखंडीच्या किल्ल्याची पाडापाड बरीच झाली होती. म्हणून त्यांनी आपले निवासस्थान तेथून हालवून जमखंडीपासून दीड मैलावर असलेल्या रामेश्वर या अनादि देवस्थानाजवळचा डोंगर फोडून तेथे रामतीर्थ नावाची वसाहत स्थापन केली. किल्ल्यातील जुन्या वाड्यात कचेऱ्या आणल्या. त्यांची भक्ती शंकरावर फार. त्यातून त्यांना एका गोसाव्याने दिलेल्या बाणाची भक्तिभावाने पूजा केल्याने बंडाच्या लागलेल्या झळीतून ते सहीसलामत पार पडले अशी त्यांची श्रद्धा. त्यामुळे त्याची किल्ल्याच्या भागात उमारामेश्वर म्हणून देऊळ बांधवून प्राणप्रतिष्ठा केली. त्या देवळाजवळच शहराचा पेठभाग उमारामेश्वर पेठ म्हणून बसविला.

श्रीरामेश्वरासंन्निध निवडलेल्या स्वत:च्या निवासस्थानाच्या निमित्ताने बसविलेल्या नव्या रामतीर्थ वसाहतीसाठी सुमारे तीस-बत्तीस लाख रुपये खर्च करून अरण्यात अक्षरश: नंदनवन निर्माण केले. तेथे त्यांनी मॅन्शनहॉल, दिलखूष, विल्डरनेस हॉल असे सुंदर, भव्य बंगले, खासगी व मोठ्या प्रयोजनासाठी पाकशाळा, कमिसरिएट पागा, हत्तीकरता सुंदर ठाणी, विहिरी, तलाव वगैरे लहानमोठी बांधकामे उठविली. जागजागी सुंदर बागबगिचे लाविले. त्याचप्रमाणे उमारामेश्वर, त्रिपुरसुंदरी, हरिहरेश्वर, कामेश्वर, सर्वेश्वर, मारुती आणि दुर्गाबागेमध्ये श्रीदत्तात्रेय यांप्रमाणे लहानमोठी देवालये बांधविली. श्रीरामेश्वराचे अनादि स्थानाजवळही एक श्रीदत्तात्रेयाचे देवालय बांधविले.



## चौफेर सुधारणांचा प्रदीर्घ राज्यकारभार

गावात पाण्याची नेहमी टंचाई असे. ती दूर करण्यासाठी कट्टेगेरी व लकणगेरी हे दोन मोठे व विस्तीर्ण तलाव त्यांनी बांधून काढले. कट्टेगेरी तलावापासून गावात सर्वत्र नळाने पाणी पोहोचविण्याची व्यवस्था केली. ही योजनाही अपुरी आहे असे वाटून नदीतून पाच मैलांवरून पाणी आणविण्याची त्यांनी योजना आखली होती. तथापि, ती त्यांचे कारकिर्दीत पूर्णतेस आली नाही.

गावात सध्या दिसून येणारी परशुरामभाऊ हायस्कूलची भव्य इमारतही त्यांच्या कारकिर्दीत बांधली गेली. स्वत: ज्ञानजिज्ञासू असल्यामुळे त्यांनी नाना प्रकारचे ग्रंथ संपादन करून एक वाचनालयही त्यांनी रामतीर्थवर स्थापन केले होते. शिक्षण त्यांनीच मोफत केले. पन्नास गरीब विद्यार्थ्यांसाठी सरकारी वाड्यातून मधुकरी दोन्ही वेळच्या जेवणास पुरेल इतकी देण्याची व्यवस्था त्यांनीच प्रथम सुरू केली. या त्यांच्या सोयीचा फायदा बऱ्याच गरीब, परंतु हुषार विद्यार्थ्यांनी परिपूर्णतेने घेऊन, ज्ञानसंपादन करून नावलौकिक व पैसाही मिळविला आहे. त्यांच्या कारकिर्दीत शिक्षणखात्यावर पाच हजारांपासून वाढतवाढत अखेरीस एकोणीस हजारांपर्यंत खर्च

वाढत गेला आणि चाळीस शाळांतून चाळीसशे मुलेमुली शिक्षण घेत होती. ज्ञानप्रसारासाठी त्यांनी 'परशु' नावाचे वर्तमानपत्र चालविले होते. त्यांच्या या विद्याप्रियतेचा गौरवही सर्वत्र झाला. मुंबई सरकारने त्यांना युनिव्हर्सिटीचे फेलो व रॉयल एशियाटिक सोसायटीच्या मुंबई शाखेचे मेंबर नेमले होते.

रस्ते, शाळा, धर्मशाळा, दुष्काळी कामे, पाण्याची कामे याप्रमाणे सार्वजनिक लोकोपयोगी कामासाठी त्यानी आपल्या कारकिर्दीत शेवटच्या दहा वर्षांतच सुमारे आठ लाख रुपये खर्च केल्याचे आढळून येते. सर्व कारकिर्दीतील एकूण खर्च साठ-सत्तर लाखांपर्यंत झाला असावा असा अंदाज आहे.

नगरपालिकांची स्थापनाही संस्थान मजकुरी प्रथम यांच्याच कारकिर्दीत झाली. १८७२त जमखंडी नगरपालिका, १८७६-७७त कुंदगोळ नगरपालिका व पुढे लागलीच हुन्नूर, बन्हट्टी, सांवशी व कमडोळी येथेही त्यांची स्थापना झाली. सर्व नगरपालिकांचे अध्यक्ष सरकारनियुक्त असत.

दक्षिण महाराष्ट्रातील पटवर्धनी संस्थानांत इंग्रज सरकारच्या राज्यपद्धतीस व कायद्यास अनुसरून काम चालविण्याचा प्रथमचा बहुमान यांच्याच कारकिर्दीत या संस्थानास मिळाला असे म्हणतात. बाँबे गॅझेट व टाइम्स ऑफ इंडिया यातून यांच्या राज्यकारभाराची भरपूर प्रशंसा केली जात असे. ता. १८ जुलै १८९० मध्येतर त्यांनी एक जाहीरनामा काढून खालसा हद्दीत त्या वेळी चालू असलेले बहुतेक सर्व कायदे संस्थानास लागू केले.

याप्रमाणे राज्यकारभार खातेवारीने, अद्ययावत पद्धतीने आणि दक्षतेने पाहत असताही एका मारहाणीच्या खटल्यातील कैदी जमखंडीच्या तुरुंगात शिक्षा भोगीत होते. त्यांना इंग्रज सरकारच्या हुकुमाने पोलिटिकल एजंटमार्फत कोल्हापुरास शिक्षा भोगण्यास पाठविण्याचा प्रसंग आला. हा आपला अपमान समजून त्याचे निवारणार्थ त्यांनी रीतसर मार्गानी वरपर्यंत दाद मागून ते कैदी परत मिळविले.

त्यांच्या कारकिर्दीत संस्थानाचे उत्पन्न २४०३८८ वरून ४७६०७७ पर्यंत वाढले. सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे इतका दानधर्म व लोकोपयोगी कामासाठी पाण्यासारखा पैसा खर्च करूनही अत्यंत दक्षतेने आणि चोख राज्यकारभार चालवून अंतकाळी खासगीकडील २,१३,४०३-८-५, देवस्थानाकडील रु. ४३,०४४-६-१।। व दौलतीकडील रु. ३,७९,१६५-१०-२ अशी मिळून रोकड शिल्लक रु. ६,३५,७०३-८-८।। होती. शिवाय जडजवाहीर, सोनेरूपे, दागदागिने वगैरे पुष्कळच शिल्लक होते.

त्यांचे कारकिर्दीत नोकर लोकांचे पगार पाच तारखेचे आत बिनचूक होत. श्रीमंत आप्पासाहेब सर्व गोष्टी वेळच्यावेळी वक्तशीर करण्याबद्दल विख्यात होऊन गेले. त्यांच्या कारकिर्दीतील सर्वजातीय भोजने अमर झाली आहेत.

त्यांनी सर्व हिंदुस्थानचाप्रवास हप्त्याहप्त्यांनी केला असून, सर्व परिस्थितीचे सूक्ष्म अवलोकन केले. वेगवेगळ्या अनुभवांचा आपल्या जीवनात उपयोग करून घेतला.

संस्थानाच्या वेगवेगळ्या भागास स्वत: वरचेवर भेट देऊन जनतासंपर्क कायम ठेवला आणि त्यांच्या अडीअडचणींचे निवारण त्वरित करण्याची पराकाष्टा केली. अद्ययावत प्रकारच्या सर्व सुधारणा संस्थानात व्हाव्यात, या दृष्टीने त्यांनी स्वत: सर्व कामात पुढाकार घेतला. त्यांनी वाफेने चालणारा नांगर, मळणी करण्याचे यंत्र, कडबा तोडण्याचे यंत्र, मोठमोठाले वजनदार पदार्थ उचलून इमारतीवर चढविण्याचे यंत्र, तुळ्या कापण्याचे यंत्र, बर्फ तयार करण्याचे थोरले यंत्र, मोठमोठाले चरक, सोडावॉटर तयार करण्याचे यंत्र, ऊस गाळण्याचा तीन लाटांचा बिडाचा थोरला घाणा, दहा घोड्यांच्या शक्तीचे इंजिन, टेलिफोन, एक पोर्टेबल रेल्वे इंजिन वगैरे अनेक लहानमोठी यंत्रे आणविली होती. लोकांचे आग्रहाखातर स्वत:चा सुंदरसा उभा पूर्णाकृती पुतळाही त्यांनी जिनोवाहून करून आणविला होता. पुढे श्रीमंत भाऊसाहेबांचे कारकिर्दीत तो हायस्कुलात मधल्या हॉलमध्ये उभा करण्यात आला.

यात्रमाणे त्यांच्या कारकिर्दीकडे सहज ओझरता दृष्टिक्षेप केला तरी त्याची व्यापकता, भव्यता नेत्रदीपक वाटते. त्यांनी आपल्या कारकिर्दीत देवळं बांधली, तशीच त्यांच्या योगक्षेमाची व्यवस्था करून दिली. आपल्या कुटुंबीय परिवाराचीही चांगली व्यवस्था करून ठेवली.

गुरांचे व शेती प्रदर्शन चैत्रात आंबराईत भरवण्याची प्रथा त्यांनीच सुरू केली. ती अजूनही चालू आहे. त्यांच्या कारकिर्दीचे चालतेबोलते स्मारक म्हणजे जमखंडी गावाची रचना व त्याचे स्वरूप. जमखंडी संस्थानाच्या राजवटीचे जे स्वरूप पुढील तीन कारकिर्दीत दिसून आले, त्याचा पायाच अगदी भरभक्कम स्वरूपात श्रीमंत रामचंद्रराव आप्पासाहेब यांनी घातला होता असे दिसून येईल.

श्रीमंत रामचंद्रराव आप्पासाहेबांनी चार लग्ने केली, परंतु त्यांना झालेला मुलगा जगला नाही. अगदीच लहानपणी वारला. दुसरा मुलगा झाला नाही. म्हणून तासगाव घराण्याचे शेवटचे पुरुष माधवराव गोविंद ऊर्फ दाजीसाहेब यांचा मुलगा कृष्णराव ऊर्फ आण्णासाहेब याला श्रीमंतांनी आपल्या जवळ ठेवून त्यांचे तिसरे कुटुंब सौ. सीताबाई यांच्या बहिणीची मुलगी गोदू इच्याशी त्याचा विवाह करून दिला. त्यांचे पोटी जन्मास आलेल्या महादेव ऊर्फ दाजी यास राज्यकारभाराचे सर्व प्रकारचे योग्य शिक्षण देऊन त्यास १५ डिसेंबर १८९६ रोजी दत्तक घेतले व त्याचे नाव परशुरामभाऊ असे ठेवले.

पुढे श्रीमंत रामचंद्रराव यांच्या पाठीवरील आवाळू फुटून त्यायोगे वाढत चाललेल्या आजारात ता. १२-१-१८९७ रोजी त्यांचे देहावसान झाले. सदरचे आवाळू १६ इंच लांब व १३ इंच रुंद होते असे म्हणतात. रामचंद्रराव आप्पासाहेबांचे मरणसमयी श्रीमंत परशुरामराव भाऊसाहेब हे फक्त १४ वर्षांचे होते. त्यामुळे त्यांच्या अज्ञानावस्थेत जमखंडी संस्थानाचा राज्यकारभार इंग्रज सरकारतर्फे ॲडमिनिस्ट्रेटर मि. बाळकृष्ण नारायण वैद्य हे पाहत होते. पुढे श्रीमंत परशुरामराव भाऊसाहेब यांचे शिक्षण पुरे करण्याकरिता त्यांना कोल्हापूर मुक्कामी ठेविले. तेथे त्यांचा अभ्यास

युरोपियन ट्यूटरचे देखरेखीखाली सन १९०२ पर्यंत झाला. १९०२ मध्ये त्यांचेकडून हिंदुस्थानची सफर करविण्यात आली. पुढे काही दिवस आपल्या संस्थानाच्या राज्यकारभाराची व कायद्याची माहिती करून घेण्यासाठी ते जमखंडीस राहिले होते. अशा स्थितीत चार महिने राहिल्यावर ते राज्यकारभार पाहण्यास योग्य झाले असे मुंबई सरकारास वाटल्यावरून त्यांनी ४ जून १९०३ रोजी त्यांना मुखत्यारी दिली.

## चौथे अधिपती : व्यायाम, क्रीडाप्रेमी व सुधारक सर परशुरामभाऊ

श्रीमंत भाऊसाहेबांची कारकीर्द एकवीस वर्षांची झाली. श्रीमंत रामचंद्रराव आप्पासाहेबांनी जी राज्यकारभाराची घडी बसविली होती, तीच कायम ठेवून जरूर त्या सुधारणा करून त्यांनी फार उत्तम प्रकारे राज्यकारभार चालविला. त्यांना व्यायामाची आवड फार. देशी व विदेशी खेळांत ते फार तरबेज होते. पोलो खेळण्यात, घोड्यावर बसून घोडी दमविण्यात, ऐन महापुरात नदीतून नाव वल्हविण्यात त्यांचा हात धरणारा कोणी नसे. राज्यकारभारात त्यांनी योग्य अंमलदार वेगवेगळ्या खात्यावर नेमून प्रजेला त्रास न होईल अशा दक्षतेने कारभार करण्याचे जरूर ते अधिकार व स्वातंत्र्य त्यांना दिले. संस्थानाच्या तिजोरीवर खासगी खर्चाचा गैरवाजवी भार पडणार नाही याबद्दल ते फार दक्षता घेत असत. त्यांच्याच कारकिर्दीत शिक्षणसुधारणा करण्यासाठी कै. अ. वि. पटवर्धन (सं. 'संस्थानी स्वराज्य'), प्रो. रामभाऊ रानडे (प्रख्यात तत्त्वज्ञ व संत), श्री. गोपाळराव हुल्याळकर , कृ. ब. आनीखिंडी, के. ना. जोशी, भा. ब. महाबळ प्रभृति सभासदांची समिती नेमण्यात येऊन शिक्षणास अद्ययावतपणा आणण्याचे दृष्टीने यशस्वी प्रयत्न झाला. प्रौढ स्त्रियांचेसाठी होम-क्लासही यांच्याच कारकिर्दीत निघाला.

हल्ली आर्टस् अँड सायन्स कॉलेज आहे ती पोलो पॅलेसची इमारत त्यांच्या कारकिर्दीत बांधण्यात आली. या खेरीज पुष्कळ चांगले बंगले व इतर लोकोपयोगी इमारतीही त्यांनी बांधिल्या. रामतीर्थ, पोलो पॅलेस व क्लबच्या इमारतीत त्यांनी विजेचे दिवे आणले. सन १९०९ मध्ये पाश्चात्त्य देशांतील कलाकौशल्य, राहणी, सुधारणा वगैरे पाहून आपल्या संस्थानात तशी सुधारणा करण्याचे दृष्टीने काय करता येईल हे पाहण्याचे उद्देशाने त्यांनी इंग्लंड, फ्रान्स, इटली वगैरे देशांचा प्रवास केला. पहिल्या महायुद्धात साम्राज्यसरकारास त्यांनी द्रव्यसहाय्य तर केलेच, शिवाय १४ सप्टेंबर १९१५ मध्ये ते प्रत्यक्ष लढाईवर गेले. पश्चिम रणक्षेत्राकडील सोपविलेली कामगिरी संपवून ते डिसेंबरात परत आले. पुढे मेसापोटेमियात रेडक्रॉस कमिशनवर जाण्यासाठी ते २५-१-१९१८ रोजी पुन्हा निघाले. बसराबगदाद वगैरे ठिकाणची पाहणी करून ते २ मार्च १९१८ मध्ये परत आले.

त्यांच्या कारकिर्दीत १९१७ व १९२२ मध्ये अनुक्रमे लॉर्ड विलिंग्डन व लॉर्ड

लॉइड या दोघा मुंबईच्या गव्हर्नरांनी संस्थानास भेटी दिल्या. त्यांना कॅप्टन, के. सी. आय. इ.,ए.डी.सी. अशा पदव्याही इंग्रज सरकारातून मिळाल्या. संस्थानाचा राज्यकारभार चांगल्या रीतीने चालवीत असल्याचा लौकिक इंग्रज सरकारात झाल्याने मिरज ज्युनियरचे अधिपती व रामदुर्गचे अधिपती यांना आपल्या संस्थानाची पूर्ण मुखत्यारी मिळण्यापूर्वी सहा महिनेपर्यंत राज्यकारभाराचे व कायदेकानूंचे ज्ञान होण्यासाठी जमखंडी दरबारात मुंबई सरकारतर्फे ठेवण्यात आले होते. संस्थानात औद्योगिक सुधारणेस हातभार लागावा म्हणून त्यांनी महाराजा कॉटन जिन प्रेस फॅक्टरी काढली होती.

भाऊसाहेबांना पहिल्या कुटुंबापासून १९०६ मध्ये मुलगा झाला. त्याचे नाव शंकरराव आप्पासाहेब ठेवण्यात आले. त्यांचे पहिले कुटुंब १९०७ मध्ये वारले. १९०८ मध्ये त्यांनी दुसरे लग्न केले. या संबंधापासून १९१३ मध्ये त्यांना मुलगी झाली. तिचे नाव श्रीमंत शकुंतलाराजे ऊर्फ आक्कासाहेब असे ठेवण्यात आले. ता. ८ ऑगस्ट १९१५त त्यांना मुलगाही झाला. पण पुढे तो सहा महिन्यांनी वारला. या मुला-मुलीची लग्ने करण्याच्या वाटाघाटी १९२३त सुरू झाल्या. परंतु लग्न सभारंभ होण्याच्या आधी ता. २५ फेब्रुवारी १९२४ मध्ये श्रीमंत भाऊसाहेब आपल्या आवडत्या हत्तीकडून अकस्मात मारले गेले आणि या उमद्या अधिपतीचा असा शोकजनक अंत झाला! ही घटना इतकी हृदयद्रावक झाली की 'हा हन्त हन्त नलिनीं गजउज्जहार' या काव्यपंक्तीच्या वळणावर 'हा हन्त हन्त नृवरं गजउज्जहार' असे उद्‌गार तत्कालीन कविहृदयातून अगदी यथार्थपणे बाहेर पडले! कमलकोशात गुरफटलेल्या भ्रमराप्रमाणे तत्कालीन कितीक जनांच्या आशाआकांक्षा आणि ध्येयस्वप्ने धुळीस मिळाली असतील या अपघाताने!!

श्रीमंत भाऊसाहेबांच्या कारकिर्दीत संस्थानाच्या राज्यकारभारात आणि एकंदर वातावरणातच आधुनिकतेचे वारे संचारू लागले होते. जनता डोळे चोळीत नुकतीच जागी होऊ लागली होती. श्री. आण्णासाहेब कर्वे, डॉ. कूर्तकोटी शंकराचार्य प्रभृतींची भाषणे जमखंडीस होऊ लागली होती. समाजसुधारक सभा, व्याख्याने श्रीमंतांच्या कृपाछत्राखाली येथे सादप्रतिसाद देऊ लागली होती. साहित्य, नाट्यही नवे स्वरूप दाखवू लागले होते. राजकारण सोडून समाजसुधारक व शैक्षणिक चळवळी, प्रदर्शने, मेळेही श्रीमंतांचे कृपाछत्राखाली आपले आसन स्थिर करू लागल्याची चिन्हे दिसत होती. क्रमाने राजकीय सुधारणांच्या रूळावर या चळवळीची गाडी जाईल अशा आशाआकांक्षा जनतेच्या हृदयात पल्लवित होतही असतील. पण या अपघाताने या सर्वांनाच धक्का बसला असावा असे दिसते.

अशा स्थितीत श्रीमंत शंकरराव आप्पासाहेब यांच्या वयास नुकतीच सतरा वर्षे पूर्ण झाली असल्याने संस्थानाचा राज्यकारभार इंग्रज सरकार सगळाच आपल्या हातात घेईल तो घेऊ नये म्हणून कै. भाऊसाहेब यांच्या सुविद्य पत्नी मातोश्री रमाबाईसाहेब यांना रीजंट राणीसाहेब मानून रीजन्सी कौन्सिलमार्फत कारभार चालवावा

याबद्दल जनतेमार्फत तेव्हाच्या लोकसभेने चालविलेली खटपट यशस्वी झाली व दोन वर्षेपर्यंत सदर कौन्सिलमार्फत कारभार चालला. ही घटना वास्तविक लहान होती. पण तेवढ्याने त्या वेळी लोकांना आनंद झाला व 'लोकमताचा विजय जाहला, कौन्सिल आले जमखंडीला' असे मेळ्यातून गाणे गायिले गेले!! मायनॉरिटीतील दोन वर्षांचा हा राज्यकारभारही चांगला चालला.

## पाचवे अधिपती : श्रीमंत राजा शंकरराव आप्पासाहेब

ता. २८ मे १९२६ रोजी श्रीमंत शंकरराव आप्पासाहेब यांना मुखत्यारी मिळाली. यांची कारकीर्दही २१ वर्षांचीच झाली. ता. २२ ऑगस्ट १९४७ रोजी ते स्वर्गवासी झाले. १९२६ ते १९४७ हा काळ साऱ्या भारतवर्षाच्या इतिहासातच अतिशय महत्त्वाचा व खळबळीचा झाला. भारतीय स्वातंत्र्याचा लढा या काळात अति उग्र स्वरूपाचा झाला. सारी भारतीय जनता या कालखंडात झालेल्या आंदोलनांनी ढवळून निघाली होती. स्वराज्य संपादनाचे प्रयत्न मोठ्या व्यापक व विविध प्रकारांनी या काळात अत्यंत निकराचे झाले. या आंदोलनांनी संस्थानी सत्ताही गदागदा हालविल्या गेल्या. ब्रिटिश साम्राज्याला १५-८-४७ रोजी भारतातून काढता पाय घ्यावा लागला आणि संस्थानी सत्ता अतिशय खिळखिळ्या झाल्या. या अत्यंत तुफानी आणि खवळलेल्या दर्यामधून आपली राज्यनौका हाकण्याचा घोर प्रसंग श्रीमंत शंकरराव आप्पासाहेब यांचेवर आला. आजवर कधीही उत्पन्न न झालेल्या नव्या प्रश्नांना, नव्या व प्रभावी प्रजाकीय आव्हानांना तोंड देण्याचा प्रसंग त्यांच्या कारकिर्दीत त्यांच्या समोर सतत उभा राहिला. त्यांच्या कारकिर्दीचे अवलोकन करणाऱ्या कोणासही असे कबूल करावे लागेल की त्यांनी या सर्व प्रश्नांनी गडबडून न जाता धीमेपणाने व अत्यंत मुत्सद्देगिरीने तोंड देण्याची शिकस्त केली. तुलनेच्या दृष्टीने श्रीमंत रामचंद्रराव आप्पासाहेबांची कारकीर्द एका दृष्टीने जशी संस्मरणीय झाली, तशीच दुसऱ्या एका दृष्टीने श्रीमंत राजा शंकरराव आप्पासाहेबांची कारकीर्द संस्मरणीय झाली!

## वीज, पाणीपुरवठा व उच्च शैक्षणिक सुविधा

राज्यकारभारावर आल्यावर त्यांनी महत्त्वाच्या सुधारणा घडवून आणल्या. आपल्या वडिलांचे यथोचित स्मारक व्हावे यासाठी पुण्याच्या शिक्षण प्रसारक मंडळीस दोन लाख रुपयांची उदार देणगी देऊन त्यांनी सदर मंडळींच्या न्यू पूना कॉलेजास सर परशुरामभाऊ कॉलेज असे नाव देवविले व तेथे संस्थानाच्या पन्नास विद्यार्थ्यांना मोफत शिक्षण मिळण्याची व्यवस्था केली. कुंदगोळ येथील श्री. हरभट्ट ए. व्ही.

स्कूलचे हायस्कूलात रूपांतर केले व त्यास ग्रँट चालू केली. जमखंडी शहरासाठी कायमची पाण्याची योजना म्हणून ६/७ लाख रुपये खर्च करून जमखंडीहून सहा मैलांवर कृष्णानदीवर सनाळ गावी वॉटरवर्क्स बांधविले व तेथून नळ घालून गावाजवळच्या टेकडीवर पाण्याच्या दोन मोठ्या टाक्या बांधून त्यात पाणी साठवून गावात घरोघर नळाने पाणी देण्याची व्यवस्था केली. कुंदगोळ येथील वॉटरवर्क्सची योजना पुरी केली. आपल्या खासगीतून जमखंडी शहराला विद्युत पुरवठा करण्याच्या हेतूने इलेक्ट्रिक पॉवर हाऊस काढले. जमखंडी व सावळगी येथे व्यापारी लोकांसाठी कॉटन मार्केटची स्थापना केली. शहराची वाढती लोकसंख्या पाहून त्यांनी टाऊन एक्स्टेन्शनची योजनाही आखून तयार केली होती. या खेरीज खुद्द स्वत:साठी त्यांनी उत्कृष्ट व भव्य राजवाडा ५-६ लाख रुपये खर्चून रामतीर्थास बांधला व श्रीमंत रामचंद्रराव आप्पासाहेब यांनी सुरू केलेल्या रामतीर्थ वसाहतीचे बांधकामास एक प्रकारे भव्य रीतीने पूर्तता आणून त्या प्रासादास 'रामचंद्र-प्रासाद' असेच यथार्थ नाव ठेवले.

१९२८ पासून ते दक्षिण महाराष्ट्रातील संस्थानिकांच्या दक्षिण संघातर्फे नरेंद्र मंडळाचे अखेरपर्यंत सभासद होते. पुण्याच्या शिक्षण प्रसारक मंडळाचे ते कायमचे अध्यक्ष होते. पूना संस्कृत कॉलेज असोसिएशनच्या मॅनेजिंग कौन्सिलचेही ते अध्यक्ष होते. अनेक विद्वान, गुणीजन व समाजसंस्था यांना त्यांनी सढळ हाताने द्रव्यसहाय्य केले असून अनेक फंडांनाही त्यांनी द्रव्यद्वारा मदत दिली आहे.

## राजकीय सुधारणा

राज्यकारभारातही त्यांनी बऱ्याच सुधारणा घडवून आणल्या. मोफत व्हेटरनरी दवाखान्याची सोय त्यांनी केली. सरकारी दवाखान्यात मॅटर्निटी वॉर्डाची सोय त्यांनी उपलब्ध करून दिली.

१९२७ त प्रजापरिषदेचे पहिले अधिवेशन झाले व प्रजेच्या मागण्या अधिकाधिक संघटित स्वरूप घेऊ लागल्या. या बदलत्या परिस्थितीस अनुसरून त्यांनी राज्यकारभाराच्या खात्यांची पुनर्घटना केली. स्वतंत्र हायकोर्ट बेंचची स्थापना केली. मुलकी व न्याय खात्याची फारकत केली. सन १९३३त संस्थानात मोर्ले-मिंटो सुधारणांच्या धर्तीवर प्रातिनिधिक कायदेमंडळ स्थापन केले. त्यात लोकनियुक्त १६ व सरकारी आणि सरकारनियुक्त १४ असे एकूण ३० सभासद होते. १९४१त मॉन्टेग्यू-चेम्सफर्ड सुधारणांच्या धर्तीवर त्यांनी संस्थानात द्विदल राज्यपद्धती सुरू केली. कायदेमंडळात २४ लोकनियुक्त व १२ सरकारी व सरकारनियुक्त असे प्रमाण ठेवले. सोपीव खात्यासाठी एक लोकनियुक्त मंत्री ठेवला. पुढे १९४७ मध्ये प्रांतिक स्वराज्याचे धर्तीवर राज्यघटना कायदा अमलात आणला. कायदेमंडळ फक्त चोवीस लोकनियुक्त

सभासदांचे ठेवले. याखाली लोकनियुक्त मंत्री तीन झाले. प्रजेला क्रमाक्रमाने राज्यसत्तेत सहभागी करण्याच्या या काळात प्रजापरिषदेचे पुढारी श्री. अनंत वासुदेव साबडे वकील यांच्यावर मारेकऱ्यांनी केलेल्या प्राणघातक हल्ल्याचे पर्यावसान दि. २५-५-४७ रोजी त्यांच्या दु:खद निधनात व्हावे, ही जनतेत हळहळ निर्माण करणारी दुर्दैवी घटनाच होय!!

## 'राजा' किताब संपादन

देवाधर्माविषयी त्यांची अतिशय निष्ठेची भावना होती. दरसाल श्री गणपतीचा, नवरात्राचा, शिवरात्रीचा उत्सव ज्या थाटाने व वैभवाने साजरे होत तसा थाट व वैभव इतरत्र क्वचितच पाहावयास मिळे. संस्थानमजकुरी गोवध बंदीचा कायदाही त्यांनी अमलात आणला होता.

त्यांचे कारकिर्दीत १९२७ व १९३२ या दोन सालांत मुंबईचे गव्हर्नर सर लेस्ली विल्सन व सर फ्रेड्रिक साइक्स यांनी संस्थानास भेटी दिल्या होत्या. सन १९३५ साली बादशहा पंचम जॉर्ज यांच्या वाढदिवसानिमित्त झालेल्या पदवीदानाचे प्रसंगी त्यांना वंशपरंपरा 'राजा' हा बहुमानाचा किताब देण्यात आला. ते बादशहा सहावे जॉर्ज यांच्या राज्यरोहणप्रसंगी लंडनला गेले होते. त्या निमित्ताने त्यांनी युरोपातील प्रमुख देशही पाहिले. मोठमोठ्या प्रसिद्ध व्यक्तींचा परिचय करून घेतला व परदेशांतील प्रसिद्ध संस्थाही पाहिल्या. जानेवारी १९३६त ते सकुटुंब सपरिवार सिलोन, सिंगापूर, पिनाँग वगैरे ठिकाणी जाऊन पूर्वेकडील ईस्ट इंडिज प्रदेशातून प्रवास करून आले होते.

## सार्वभौमत्वाचे समाधान

१५ ऑगस्ट १९४७ रोजी भरतखंड स्वतंत्र झाले. त्यामुळे संस्थानावरील अधिराजसत्ताही नाहीशी होऊन त्यांना एका स्वतंत्र सार्वभौम संस्थानाचे अधिपती म्हणून जगण्याचे भाग्य लाभले. पुढे आठच दिवसांत त्यांची इहलोकाची यात्रा संपली असली तरी हे मिळालेले समाधान अर्थातच बहुमोल होते!

त्यांचा स्वभाव एकतंत्री राजास साजेल अशा पद्धतीचा स्वाभाविकत:च असला, तरी नव्या परिस्थितीशी मुत्सद्देगिरीने टक्कर देण्यासाठी सोसावा लागणारा मनस्ताप त्यांनी महत्प्रयासाने सोसला. प्रत्येक बारीकसारीक बाबतीत स्वत: लक्ष घालणे हा त्यांचा स्वभावच बनून गेला होता. राज्यकारभार हे त्यांच्या आवडीचे खेळणेच जणू झाले होते. उत्पन्न होणाऱ्या नव्या नव्या प्रश्नांचे सांगोपांग ज्ञान त्यातील खाचखळगे,

व बारकावे यासह ते करून घेत आणि मग आपले सुकाणू इष्ट त्या दिशेने फिरवीत. स्वत:चा मान, मोठेपणा आणि वैभव दुसऱ्याला जाणवेल आणि त्यात कमीपणा येणार नाही याबद्दल ते सदैव दक्ष असत.

मूळ पुरुष हरभट हे ब्रह्मर्षि होते. त्यांनी रामचंद्रराव आप्पासाहेबांचा अवतार घेऊन राजर्षिपदाची इच्छा तृप्त करून घेतली असे म्हणतात. त्याचप्रमाणे श्रीमंत रामचंद्रराव आप्पासाहेबांनी शंकरराव आप्पासाहेबांच्या रूपाने पुन्हा जन्म घेऊन वैभवाचा कळस उपभोगला आणि आपणच आरंभिलेले कार्य पूर्णतेस नेले असे म्हणण्याचा मोह त्यांचे कार्याकडे पाहून कोणासही होईल!

## सहावे व शेवटचे अधिपती : श्रीमंत राजे परशुरामराव

श्रीमंत शंकरराव आप्पासाहेबांच्या निधनानंतर त्यांचे पुत्र श्रीमंत राजे परशुरामराव यांनी राज्यसूत्रे आपल्या हाती घेतली. त्या वेळी भारत स्वतंत्र झाला होता आणि त्याच्या भावी घडीत संस्थानांचे, विशेषत: लहान संस्थानांचे स्थान कोणते राहणार, याबाबत प्रश्न उभा झाला होता. १९४६त भारतास सत्तादान करण्याबाबत जेव्हा भारतीय पुढारी व साम्राज्य सरकार यांच्यात वाटाघाटी सुरू होत्या त्या संधीसच बदलती परिस्थिती ओळखून भारताच्या भावी घटनेत आपणास स्थान मिळू शकेल या आशेने दक्षिणी संस्थानांचे संघराज्य म्हणून एक घटक निर्माण करण्याबाबत संस्थानिकांची हालचाल चालू होती व त्यास मूर्तस्वरूपही येऊ लागले होते. स्वराज्यदानाच्या वाटाघाटीस इष्ट फळप्राप्ती कधी होणार याचा काहीच अंदाज संस्थानी प्रजेच्या पुढाऱ्यांना तेव्हा निश्चित असा नसल्याने व नियोजित संस्थानी संघराज्याचे स्वरूप लोकशाहीचे राहणार असल्याने दगडापेक्षा वीट मऊ या न्यायाने व्यक्तिगत संस्थानांच्या अस्तित्वापेक्षा लोकशाहीच्या पायावर उभे राहणारे संघराज्य बरे असे मानण्याकडे प्रजापुढाऱ्यांचाही कल होऊ लागला होता. संस्थानिकांच्या आणि संस्थानी राज्यकारभाराच्या दृष्टीने दिवसेंदिवस वेगवेगळ्या पृथक संस्थानांना राज्यकारभाराचा वाढत जाणारा खर्चाचा बोजा डोईजड होत चालल्याने सामाईक तत्त्वावर राज्यकारभार चालविणे आवश्यक वाटू लागले होते. संघराज्य योजनेने हा हेतू सफल होणार होता. त्याचबरोबर असाही एक विचार होता की, सामाईक तत्त्वांवर राज्यकारभार चालवावयाचाच ठरला, तर तो संघराज्याचे स्वरूपाने करण्यापेक्षा नजीकच्या प्रांतिक सरकारच्या सहकार्याने का चालवू नये?

अशा प्रकारचे विविध प्रश्न श्रीमंत राजे परशुरामराव यांच्यापुढे होते. त्यातून त्यांनी सर्वांस चकित करून टाकणारा आणि कालोचित असा दूरदृष्टीचा, समंजस आणि धडाडीचा निर्णय घेऊन साऱ्या संस्थानिकांना राष्ट्रहितकारी असा एक धडा घालून देऊन आपले नाव अजरामर करून टाकले! त्यांनी विचार असा केला की,

व्यक्तिश: छोटी संस्थाने ही आपले अस्तित्व टिकून धरण्यास असमर्थच जर आहेत, तर संघराज्य अगर प्रांतिक सरकारच्या सहकार्याचा टेकू देऊन ती कशीबशी जिवंत राखण्यात स्वारस्य कसले? त्यापेक्षा त्यांचे विलिनीकरण करणे हेच भारतीय हिताचे नाही काय? असा विचार करून कै. वल्लभभाई पटेल आदि भारत सरकारच्या प्रतिनिधींशी या दृष्टीने विचारविनिमय करून आपले मत त्यांना कळविले आणि भारत सरकारची या गोष्टीस संमती मिळविली. हाती असलेल्या सत्तेचे उदक अखिल भारताच्या हिताची व्यापक दृष्टी नजरेसमोर ठेवून स्वखुषीने भारत सरकारच्या हातावर सोडणारा हा एकमेव संस्थानाधिपती पुढे आलेला पाहून सारे भारतीय मुत्सद्दी चकित झाले, संस्थानिक बंधू गडबडून गेले आणि विलिनीकरणाचे निश्चित भवितव्य सर्वांच्या समोर स्पष्टपणे उभे राहिले.

श्रीमंत राजे परशुरामरावांचा हा निर्णय ता. ८ मार्च १९४८ रोजी प्रत्यक्षात आला आणि त्या तारखेस जमखंडी संस्थान भारतात विलीन झाले. एक प्रकारे भारतमातेचा हा ठेवा तिच्या स्वातंत्र्यानंतर तिला श्रीमंत राजेसाहेबांनी परत केला आणि अज्ञान पालकत्वाचे आपले कर्तव्य योग्य प्रकारे बजावले.

या प्रकारे श्रीमंत राजे परशुरामरावांची राजवट फक्त सहा महिन्यांचीच झाली. पण तेवढ्याही अल्पावधीत त्यांनी आपल्या राज्यकारभाराचे सूत्र संपूर्ण प्रजामतानुवर्ती असे ठेवून त्याग, औदार्य, दूरदर्शित्व, अतुल धैर्य आणि धडाडीची परिसीमा गाठली. तेवढ्या अवधीत त्यांनी नोकरांचे पगार वाढविले, संस्थानाच्या काही खात्यांचे कारभार प्रांतिक सरकारच्या सहकार्याने चालविण्याच्या दिशेने पत्रव्यवहार चालू केला आणि गांधी-वधोत्तर दक्षिणी संस्थानांत झालेल्या दंगलीचे पडसाद आपल्या संस्थानात उठणार नाहीत याबद्दल जरूर त्या दक्षतेचे हुकूम संबंधी अधिकाऱ्यांना देऊन व स्वत: सर्व तऱ्हेने सुसज्ज राहून जमखंडी संस्थान पूर्ण सुरक्षित राखले. तसेच कंट्रोल खात्याकडील नफ्याची सुमारे ७।। लाखांची रक्कम श्री कृष्णानदीवर पूल बांधविणे व बन्हट्टी व कुंदगोळ येथील पिण्याच्या पाण्याची टंचाई कायमची दूर करणे या कारणासाठी ट्रस्ट करून राखून ठेवली आणि आपल्या प्रजाभिमुख धोरणांचे प्रत्यंतर आणून दिले.

त्यांनी स्वत:चा राज्यारोहण समारंभही केला नाही आणि त्या निमित्त कोणत्याही प्रकारचा खर्च करून प्रजेच्या पैशाचा अनाठायी विनियोगही केला नाही. संस्थानाचा सरंजामही हळूहळू कमी केला, खासगी खर्चात कमालीची कपात केली. आणि लोकराज्याचे खरेखुरे नेतृत्व पत्करण्याची आपली पात्रता सिद्ध केली. त्यांचे कारकिर्दीत राजा आणि प्रजा यातील विग्रह नाहीसा झाला आणि दोघांच्या संबंधात एक अपूर्व अद्वैत निर्माण झाले. प्रजापरिषदेच्या शेवटच्या बन्हट्टी येथील अधिवेशनाचे ते स्वत:च उद्‌घाटक होते आणि तिचे ध्येय 'जबाबदार राज्यपद्धतीच्या ऐवजी भारतीय राज्यात विलीन होणे' असे बदलण्यास ते स्वत:च प्रेरक झाले. या सर्व कारणांमुळे त्यांचा विलिनीकरणाचा निर्णय जरी कालोचित होता, तरी या प्रजामतानुवर्ती राजाच्या

छत्रास आपण मुकणार याचेच दु:ख त्या वेळी अनेकांना वाटले. असो!

जमखंडी नगरपालिकेने या प्रसंगी दिलेल्या मानपत्रात म्हटल्याप्रमाणे इतिहासप्रसिद्ध परशुरामभाऊ पटवर्धन यांनी स्वपराक्रमाने तत्कालीन स्वराज्यसत्तेस जशी बळकटी आणली, त्याच प्रमाणे या अखेरच्या परशुरामभाऊ पटवर्धनांनी विलिनीकरणाचा धडाडीचा निर्णय घेऊन चालू स्वतंत्र भारताच्या मध्यवर्ती सरकारास बळकटी मिळवून देण्यासच सहाय्य केले असल्याने त्यांनी आपले नाव यथार्थ करून दाखविले असून पटवर्धन घराण्याची कीर्ति अजरामर करून ठेवली आहे.

## प्रजेचा कार्यभाग

'ठोठावा म्हणजे दार उघडेल' या उक्तीप्रमाणे आपल्या मागण्या वेशीवर टांगून त्या पदरात पाडून घेण्यासाठी प्रजेनेही हालचाल केलीच पाहिजे. नुसते राजे चांगले आणि प्रजाहितकारी आणि प्रगतिप्रिय आहेत, एवढे म्हणून चालण्यासारखे नसते. राजांनी आपल्या मनाप्रमाणे एकतर्फी सुधारणा कितीही केल्या, तरी प्रजेच्या सर्व अडचणी त्यामुळे दूर होतीलच असे नाही. पायतणातील खिळा कुठे बोचतो ते त्या पायात घालणाऱ्यालाच कळणार! त्याप्रमाणे प्रजेच्या अडचणीची जाणीव प्रजेलाच असणार. तिनेच त्यांना वाचा फोडल्याखेरीज त्या राजाला कशा कळणार?

## १९१७ पर्यंतची स्थिती

जमखंडीच्या प्रजेकडून असा प्रयत्न १९१७ पूर्वी समाजसेवाभावी व्यक्तीकडून वैयक्तिक पातळीवर मात्र झाल्याचे दिसते. कै. यशवंत गणेश ऊर्फ आप्पासाहेब वाटवे व कै. सदाशिव धोंडो पेंडसे हे दोघे वकील अशाकामी जनतेचे पुढारीपण घेत असे दिसते. स्वत:ला न्यायमूर्ती रानडे यांचे शिष्य म्हणविणारे कै. तम्माण्णाप्पा चिक्कोडी यांचाही आवर्जून उल्लेख केला पाहिजे. ते बन्हट्टीस राहत आणि शिक्षण कानडी भाषेतून दिले जावे व दरबारची भाषा कानडी असावी, या मुद्यावर भर देऊन ते जनतेच्या मागण्या मांडीत. त्या काळी 'विद्याभिरुचि वर्धक मंडळ' आणि त्यांच्या शाखा म्हणून 'वाचन वाटिका' आणि 'वाग्धैर्योत्पादिनी' अशा दोन नावांखाली या मंडळीचे काम चाले. या वक्तृत्व सभेमार्फत श्री. अंताजीपंत पटवर्धन, श्री. जनूभाऊ करंदीकर, श्री. दत्तोपंत मिरजकर (मुधोळ), श्री. तम्मण्णाप्पा चिक्कोडी (बन्हट्टी), शंकरराव जोशी, वामनराव पटवर्धन, विठ्ठलराव शिंदे, आप्पासाहेब वाटवे, सदाशिवराव पेंडसे वगैरेंची व्याख्याने वरचेवर होत.

## लोकसभेचा काळ : १९१७ ते १९२७

व्यक्तिगतरीत्या होणाऱ्या या समाजकार्यातून अधिकाधिक कार्यकर्त्यांचा मेळावा

वरचेवर एकत्र येत गेला आणि १९१७ च्या सुमारास लोकसभा स्थापन करण्याच्या कामी येथील श्री. भास्कर बहिरव महाबळ (नंतरचे न्यायमंत्री), श्रीनिवास दासो आनिखिंडी, यशवंत गणेश वाटवे, सदाशिव धोंडो पेंडसे, डॉ. दामोदर रामचंद्र हुल्याळकर, लक्ष्मण विष्णू परांजपे, राचप्पा आंबली, विठ्ठलराव फाटक, वासुदेवराव वाटवे, भीमाजी विनायक आपटे, पुरुषोत्तम केशव फडके, माधवराव त्रिमलराव देशपांडे वगैरेंनी पुढाकार घेतला होता.

श्रीनिवास दासो आनिखिंडी हे पहिले अध्यक्ष होते. त्यानंतर दरसाल निरनिराळे अध्यक्ष निवडले जात. याप्रमाणे श्री. फडके, आबासाहेब परांजपे, विठ्ठलराव फाटक, सदाशिवराव पेंडसे, डॉ. हुल्याळकर यांनी अध्यक्ष म्हणून कामे केली. श्री. महाबळ हे दोन वर्षे सेक्रेटरीचे काम पाहत होते.

सनदशीर मार्गाने प्रजाजनांच्या अडचणी सरकारच्या नजरेस आणून त्या दूर करून घेणे आणि प्रजाजनांची सर्व बाजूंनी सुधारणा होण्याविषयी प्रयत्न करणे हे या सभेचे उद्दिष्ट होते. दरबारचे वेळी अशा मागण्या सरकारच्या निदर्शनास आणण्यात येत असत. पाण्याच्या पुरवठ्याच्या तक्रारी, गोवध बंदी, मद्यपान बंदी, कानडी दप्तर करणे, राजकीय सुधारणांची मागणी वगैरे स्वरूपाच्या मागण्या मांडण्यात आल्या होत्या.

श्रीमंत सर परशुरामभाऊंच्या आकस्मिक निधनानंतर श्रीमंत डॉवेजर राणीसाहेबांना रीजन्सीचे अधिकार देऊन एका कौन्सिलची व्यवस्था करावी, अशी लोकसभेने मागणी केली व ती मान्य झाली.

### प्रजापरिषद : १९२७-१९४७

पुढे लोकसभा जास्त प्रातिनिधिक व्हावी म्हणून जमखंडी संस्थान प्रजापरिषद भरविण्याची खटपट चालली असता श्री. महाबळ यांनी सरकारी नोकरी पत्करली व श्री. वामन त्रिंबक ऊर्फ भाऊराव आपटे यांनी लोकसभेच्या कामात लक्ष घालण्यास सुरवात केली. अखेर १९२७ मध्ये प्रजापरिषद भरण्याचे ठरले व लोकसभेने आपल्या कामाची सर्व सूत्रे प्रजापरिषदेकडे सोपवून विश्रांती घेतली.

ता. ८ व ९ ऑगस्ट १९२७ रोजी कै. न. चिं. ऊर्फ तात्यासाहेब केळकर यांच्या अध्यक्षतेखाली जमखंडी संस्थान प्रजापरिषदेचे पहिले अधिवेशन जमखंडी येथे झाले. हे अधिवेशन धरून पुढील वीस वर्षांत म्हणजे विलिनीकरणापर्यंत प्रजापरिषदेची एकूण बारा अधिवेशने झाली. दुसरे अधिवेशन बन्हट्टी येथे श्री. पंडितप्पा चिक्कोडी यांच्या अध्यक्षतेखाली दि. १३ व १४ फेब्रुवारी १९२९ रोजी झाले. तिसरे अधिवेशन हुन्नूर मुक्कामी दि. ८-२-१९३१ रोजी श्री. श्रीनिवासराव कौजलगी यांच्या अध्यक्षतेखाली झाले. या अधिवेशनास महर्षि कर्मवीर आण्णासाहेब शिंदे उपस्थित होते व त्यांचे गोलमेज परिषदेवर दणदणीत भाषण झाले. चौथे अधिवेशन कुंदगोळ येथे श्री. विश्वनाथराव जोग यांच्या अध्यक्षतेखाली दि. २८ व

२९ जानेवारी १९३३ रोजी झाले. पाचवे अधिवेशन सावळगी येथे श्री. नारायणराव जोशी यांच्या अध्यक्षतेखाली दि. २० व २१ मार्च १९३५ रोजी झाले. सहावे अधिवेशन सांवशी येथे दि. ३० व ३१ मे १९३८ व सातवे अधिवेशन जमखंडी येथे दि. ३ व ४ जून १९३९ रोजी झाले. या दोन्ही अधिवेशनांचे अध्यक्ष श्री. अंदानेप्पा दोडमेट्टी हे होते. १९४०च्या कुंचनूर येथील आठव्या अधिवेशनाचे अध्यक्ष श्री. टी. आर. नेस्वी हे होते. १९४१च्या तुंगळ येथील नवव्या अधिवेशनास श्री. टी. सिदलिंगय्या हे अध्यक्ष होते. १९४४च्या कुंदगोळ येथील अधिवेशनास श्री. दासप्पा हे अध्यक्ष होते. १९४५च्या जमखंडी येथील अकराव्या अधिवेशनास श्री. बाळासाहेब खेर हे अध्यक्ष होते. १९४७ च्या बाराव्या आणि शेवटच्या अधिवेशनास पुन्हा श्री. अंदानेप्पा दोडमेट्टी हेच अध्यक्ष होते.

काँग्रेसच्या बैठकीत कार्यक्षमता आणण्यात जे स्थान महात्मा गांधींना दिले जाते, तेच स्थान जमखंडी संस्थानच्या प्रजापरिषदेच्या अधिवेशनाच्या बाबतीत श्री. अंदानेप्पा दोडमेट्टी यांना दिले पाहिजे. प्रजापरिषदेच्या कार्यकारिणीला त्यांनी वर्षभर कार्यरत ठेवून, संघटनेत नवे सामर्थ्य उभे करून ते जनतेच्या आणि दरबारच्या प्रत्ययास आणून दिले. दि. १८ व १९ जून १९३८ रोजी रंगराव दिवाकर यांच्या नेतृत्वाखाली प्रजापरिषदेच्या पुढाऱ्याशी वाटाघाटी करून ज्या मागण्या मान्य केल्याचे दि. २४-६-३८ च्या राज्यारोहण दरबारात राजेसाहेबांनी जाहीर केले, ते श्री. दोडमेट्टी यांनी निर्माण केलेल्या नव्या शक्तीचे प्रतिफळच म्हणावे लागेल.

संस्थानात जबाबदार राज्यपद्धती स्थापण्याचे मान्य करून सुधारणा कमिटीची स्थापनाही त्यांनी केली. शेतसारा पंचवीस टक्के कमी केला. नगरपालिकेतून लोकनियुक्त सभासद ३/४ राहतील असे त्यांनी जाहीर केले. इतरही बऱ्याच सवलती जाहीर केल्या.

प्रजापरिषदेच्या शेवटच्या अधिवेशनाचे उद्घाटकच राजेसाहेब होते आणि त्यांनीच संस्थानाच्या विलिनीकरणाचा निर्णय जाहीर केला.

प्रजापरिषदेच्या या कालखंडात डॉ. हुल्याळकर व श्री. अ. वा. साबडे यांच्याखेरीज जमखंडीतील श्री. पी. एम. बांगी, एम. एम. अथणी, जी. ए. होसूर, बी. डी. जत्ती, जी. के. गाडगीळ, एस. बी. पोटे, ए. डी. मुधोळे, तिलोकचंद लाहोटी, वाटवे वकील, मा. हु. कांबळे, कुंदगोळचे जी. डी. आपटे, शिवाजीराव कुलकर्णी, होर्ती वकील, पी. बी. कोरी आणि बन्हट्टीचे श्री. व्ही. के. मालापूर, पराप्पा मंडी, डी. जी. भद्रण्णवर, च. च. अबकार, एम. टी. नुच्ची वगैरेंचा सहभाग व कार्य उल्लेखनीय आहे.

विधिमंडळाचे अध्यक्षपद (स्पीकर) लोकनियुक्त झाल्यावर श्री. व्ही. एस. ऊर्फ नानासाहेब फडके यांची त्या जागी निवड झाली. त्यांची कामगिरी लोकप्रिय झाली.

सोपीव खात्याचे मंत्रीपद श्री. व्य. रा. ऊर्फ बंडोपंत देवधर, श्री. पी. एम. बांगी व श्री. बी. डी. जत्ती यांना क्रमाने मिळाले.

संपूर्ण लोकनियुक्त विधिमंडळातून राज्यकारभार पाहणारे प्रजापरिषदेचे तीन लोकनियुक्त मंत्री - ना. बी. डी. जत्ती (गृहखाते), ना. होर्ती (अर्थखाते), ना. मा. हु. कांबळे (आरोग्यखाते).

## 'संस्थानी स्वराज्य' व अनंतराव साबडे यांचे हौतात्म्य

प्रजेचा हा कार्यभाग यशस्वी होण्यासाठी सभा, व्याख्यानांच्या बरोबर प्रजा पुढाऱ्यांचे हाती वृत्तपत्राचे आयुधही असावे लागते. कै. अनंत वासुदेव साबडे हे मधूनमधून पुण्याच्या 'संस्थानी स्वराज्य', ज्ञानप्रकाश' आदि वृत्तपत्रांतून जमखंडीच्या प्रजापरिषदेच्या अधिवेशनांची, विधिमंडळाच्या अधिवेशनांची व इतर प्रमुख राजकीय व्याख्याने व चळवळी यांची सविस्तर माहिती प्रसिद्ध करीत असत. पण मग 'संस्थानी स्वराज्य' साप्ताहिक बंद झाले. तेव्हा त्यांनी श्री. वि. अ. ऊर्फ शहासाहेब पटवर्धन यांच्या सहकार्याने 'संस्थानी स्वराज्य' साप्ताहिक १९४४ मध्ये जमखंडीस सुरू केले. त्याची कानडी आवृत्तीही त्यांनी लगेच सुरू केली. त्यामुळे लोकजागृतीचे हे नवे व्यासपीठ जमखंडीस तयार झाले. त्यांच्या लिखाणाने लोकांत चर्चेला नवे विषय मिळू लागले. संस्थानी राज्यकारभारातील बारीकसारीक घटना लोकांच्या निदर्शनास येऊन त्यावर जागोजागी लोक चर्चा करू लागले. त्यास प्रतिस्पर्धी म्हणून 'निर्भय' नावाचे कानडी साप्ताहिक श्री. रामाचार्य काखंडकी यांनी जमखंडीस सुरू केले. आणि परस्परावर होणारी टीका-प्रतिटीका लोकांमधोल कुतूहलपूर्ण चर्चेस आणखीनच वाव देऊ लागली. 'निर्भय' साप्ताहिकास दरबारचे सहाय्य असावे, असे लोकांस वाटे. १९४६ च्या १६ ऑगस्टला मुस्लीम लीगचा डायरेक्ट ॲक्शन डे जमखंडीतही मुसलमानांच्या सामुदायिक संचलन आणि मिरवणुकीने जोरात साजरा झाला. पुढे मुस्लीम लीगच्या संस्थानी चळवळ करणाऱ्या विभागाचे संमेलनही मोठ्या प्रमाणात जमखंडीस भरून त्यांनीही आपल्या मागण्या जाहीर करून त्या पदरात पाडून घेण्यासाठी चळवळ सुरू करण्याची भाषा सुरू केली. साऱ्या भारतभर हिंदूमुसलमानांतील अशांततेचे तणावपूर्ण वातावरण जे त्या काळी होते, त्यांचे पडसाद जमखंडीतही उमटू लागले होते. इकडे १९४२ सालानंतर कै. अनंतराव साबडे यांना दक्षिणी संस्थानांच्या प्रजापरिषदांच्या पुढाऱ्यांत मानाचे स्थान मिळत चालले होते. दक्षिणी संस्थानांचे सामाईक हायकोर्ट व संघराज्य स्थापनेच्या दृष्टीने विचार करणाऱ्या समितीचे अध्यक्षस्थान कै. साबडे यांना मिळाले होते व ती समिती साबडे समिती म्हणून ओळखली जात होती. जमखंडी संस्थानात नव्या राजकीय सुधारणा अंमलात येणार होत्या आणि त्यात कै. साबडे यांना महत्त्वाचे स्थान मिळण्याची लोकांना आशा वाटत होती. हे ज्यांना घडावेसे वाटत नव्हते, त्यांनी त्या वेळी निर्माण झालेल्या जातीय तणावपूर्ण अशांत परिस्थितीचा फायदा घेऊन त्यांच्यावर दि. २४ मे १९४७ रोजी सायंकाळी त्यांच्याच गल्लीत मारेकऱ्याकरवी खुनी हल्ला करविला आणि परिणामी ते दि. २५ मे १९४७ रोजी त्यात निधन

पावले असे लोकांना वाटले. या घटनेला कारण त्यांचे 'संस्थानी स्वराज्या'तील लेखन असे कोणी म्हणतात, तर त्याला इतर गुंतागुंतीची राजकीय कारणे होती असे कोणी म्हणतात. परंतु जमखंडीच्या राजकीय चळवळीच्या स्वरूपाचे त्यांनीच जे वर्णन केले आहे, त्यात न बसणारी अशी ही अपघाती घटना घडली असे म्हणावे लागते. त्यांनीच एका लेखात या चळवळीसंबंधी असे उद्‌गार काढले आहेत - "येथील चळवळ संथ व धीमेपणाने चालली आहे..... पुष्कळ मतभेदाचे प्रश्न उद्‌भवले तरी दरबार व कार्यकर्ते एकमेकांस जाणून निष्कारण ताणून तोडण्यापेक्षा समंजसपणाने साधून लोकांचे हित साधण्याकडे दोघांचेही लक्ष आहे." त्यांचा स्वतःचा स्वभाव व वागणेही या वर्णनाशी विसंगत नव्हते. असे असूनही नियतीलाच या राजकीय संघर्षयज्ञात त्यांची आहुती पडणे अवश्य वाटले असेल तर कोण जाणे!

जमखंडीच्या प्रजापरिषदेच्या नेत्यांपैकी कै. अनंतराव साबडे यांना दक्षिणी संस्थानांच्या पुढाऱ्यांत मानाचे स्थान मिळाले, तर ना. ब. दा. जत्ती हे चढत चढत अखिल भारतीय स्तरावर नाव मिळवून दिल्लीच्या सिंहासनावरसुद्धा काही काळ आरूढ होऊन आले!!

## जमखंडीतील समाज प्रबोधन आणि सांस्कृतिक कार्य

सामाजिक व्यवहारांची पातळी सभ्यतेच्या विशिष्ट स्तरावर आणण्यास समाजात चालणाऱ्या समाज प्रबोधनात्मक आणि सांस्कृतिक कार्याची फार आवश्यकता असते. हे कार्यक्रम समाजजीवनाला जसे वळण देतात तसे समाजात रुजलेल्या सुधारणांच्या किंवा समतेच्या पातळीचे प्रदर्शनही करतात.

जमखंडीचे सर्वच अधिपती सद्‌भिरुचियुक्त व उच्च कलांचे अभिमानी असल्याने त्यांचेकडून नाट्य आणि गायन कलेला चांगले प्रोत्साहन मिळत असे. नटवर्य पेंढारकरांची ललित कलादर्श संगीत नाटक मंडळी 'ही स्वतःस 'जमखंडीच्या अधिपतींच्या आश्रयाखालील' असे प्रकटपणे म्हणत असे, हे याचे ठळक उदाहरण आहे. श्रीमंत सर परशुरामभाऊसाहेब यांच्या प्रोत्साहनाने स्थानिक कलाकारांनी नाटके बसवून त्यांचे प्रयोग यशस्वीपणे करून दाखविले होते.

श्रीमंत राजे शंकरराव आप्पासाहेब यांच्या कारकिर्दीत एकवीस वर्षे प्रतिवर्षी दहा दिवसांचे गणेशोत्सव मोठ्या थाटाने साजरे झाले आहेत. त्यामधून नामांकित गवयांचे संगीताचे कार्यक्रम व कीर्तनकारांची कीर्तने अप्रतिहतपणे होत असत. त्याशिवाय नामांकित पुराणिकबुवांच्या पुराणवाचनांचे आणि दहाही दिवस गावजेवणाचे कार्यक्रम असत.

प्रत्येक अधिपतींच्या कारकिर्दीत जगद्‌गुरू शंकराचार्यांच्या भेटी झालेल्या असून

त्यांची प्रवचने व कोटिलिंगार्चनादि कार्यक्रमही झाले आहेत. श्रृंगेरी, संकेश्वर, कूडली व कांचीकामकोटी या मठांचे शंकराचार्य येऊन गेले आहेत.

गावात होणाऱ्या गणेशोत्सवात प. भा. हायस्कूलचा गणेशोत्सव त्या वेळी (संस्थानी कारकिर्दीत) लोकांचे लक्ष सर्वांत अधिक आकर्षून घेत असे. त्यात मुलामुलींचे मेळ्याचे कार्यक्रम, नाटके, पोवाडे, नकला, भाषण स्पर्धा, मैदानी खेळांचे सामने, पाठांतर स्पर्धा वगैरे कार्यक्रम होत असत.

जमखंडी गावात मेळ्यांची सुरवात श्रीमंत सर परशुरामभाऊंच्या कारकिर्दीत अखेरीअखेरीस तेव्हाच्या बळवंत संघाच्या कार्यकर्त्यांनी केली. या संघाचे वाचनालयही होते.

पुढेपुढे गणपती उत्सव नगरपालिका, व्यापारी मंडळ व इतरही छोट्यामोठ्या संस्थांमार्फत गल्लोगल्ली थाटाने साजरे होऊ लागले.

श्री. बापट कारभारी यांच्या पुढाकाराने १९०५ मध्ये त्यावेळच्या वेगवेगळ्या संस्थांचे एकीकरण करून स्थापन झालेल्या 'वाचन मंदिरा'चेच १९०६ मध्ये श्री. सौ. रमाबाईसाहेब वाचनालयात रूपांतर झाले. या संस्थेमार्फत प्रतिवर्षी नवरात्रात शारदोत्सव साजरा होत असे. अनेक नामवंत मराठी व कानडी साहित्यिक वक्ते त्यानिमित्त जमखंडीस येऊन व्याख्याने देऊन गेले. प्रा. वा. म. जोशी, के. ना. वाटवे, माधव जूलियन, डॉ. ग. श्री. खैर, प्रो. गोकाक, मुगळी, जाहागीरदार प्रभृतींची नावे उदाहरणादाखल सांगता येतील. १९५६ मध्ये या संस्थेचा सुवर्णमहोत्सव झाला, त्या वेळी महामहोपाध्याय प्रो. दत्तोपंत पोतदार, आचार्य भागवत, श्रीमती सरोजिनी महिषी व योगिनी जोगळेकर आल्या होत्या.

नवरात्र हा कर्नाटकाचा नाडहब्ब. या वेळी खेळांचे सामने, निबंध व भाषण स्पर्धा आणि व्याख्यानांचे कार्यक्रम त्या वेळी कार्यप्रवण असणाऱ्या विद्यारण्य संघामार्फत थाटाने साजरे होत.

वैशाख शुद्ध द्वितीयेला येथील मराठा मंडळातर्फे शिवजयंती, तर वैशाख शुद्ध तृतीयेला बसव समितीतर्फे बसव जयंती प्रतिवर्षी गेली कित्येक वर्षे साजरी होत असून, त्या निमित्तही खेळांचे सामने व शर्यती ठेवल्या जाऊन व्याख्याने, पोवाडे वगैरे कार्यक्रमही होतात.

अबूबकर वलीचा उरूस प्रतिवर्षी मोठ्या थाटाने साजरा होतो. तेव्हाही शर्यती, कुस्त्या आणि कवाली वगैरे कार्यक्रमही होतात.

गावात सर परशुरामभाऊंचे नावाने एक तालीमखाना असून, दंड, बैठका व इतर व्यायामाच्या साधनांखेरीज कुस्त्यांचा आखाडाही आहे. प. भा. हायस्कूलमध्येही विद्यार्थ्यांसाठी हीच सोय उपलब्ध असून क्रिकेट, हॉकी, फुटबॉल, व्हॉलीबॉल वगैरे खेळांची साधनेही उपलब्ध आहेत.

हायस्कूलातील बालवीर पथक, नमस्कार मंडळ, सन्मित्र संघ या विद्यार्थी संघटनांनी व्यायाम, खेळ, आरोग्य, स्वयंसेवक व्यवस्था याबाबत अनेक स्पृहणीय

व आदर्श प्रयोग करून दाखविले आहेत. बालवीर पथकाची हस्तलिखित मासिके अनेक महनीय व्यक्तींच्या प्रशंसेस पात्र ठरली आहेत. या कार्याचे श्रेय त्यांचे गुरुजी श्री. बर्वे व श्री. वाटवे यांना आहे. श्री. वाटवे गुरुजींनी स्थापन केलेल्या एस. एस. ए. पी. सी. क्लबने लागोपाठ २-३ वर्षे स्थानिक व बाहेरील खेळाडूंसाठी विविध खेळांचे सामनेही यशस्वीपणे आयोजित केले होते.

संस्थानाधिपतीनी सुरू केलेल्या एस. आर. ए. क्लबमार्फत प्रतिवर्षी डिसेंबरात नाताळचे सुट्टीत टेनिसचे सामने ठेवले जात. त्यात बाहेरचे अनेक खेळाडू भाग घेऊन आपले कौशल्य क्रीडारसिकांस दाखवीत असत. शिवाय पन्नास मैलांची सायकल शर्यत व तीस मैलांची धावण्याची शर्यत प्रतिवर्षी ठेवली जाई. त्यातही बाहेरगावचे अनेक स्पर्धक भाग घेत. शर्यती अत्यंत प्रेक्षणीय होत.

प्रतिवर्षी राज्यारोहण वाढदिवसाचे समारंभानिमित्त वेगवेगळ्या शर्यती व स्पर्धा, बॉडीगार्डस्‌चे वेगवेगळ्या प्रकारचे लष्करी संचलनाचे व कसरतीचे आकर्षक कार्यक्रम आणि मुख्य दरबारचे दिवशी हत्ती, घोडे, बँड, बॉडीगार्डस्, पोलिस व बॉयस्काऊटस् यांच्याकडून थाटाने व शिस्तीने श्रीमंतांना दिली जाणारी मानवंदना हे सर्वच अत्यंत प्रेक्षणीय असे.

प्रतिवर्षी जनावरांचे प्रदर्शन व जत्रा चैत्रात भरवीत. वाळूची जास्त पोती कोणता बैल ओढतो ती स्पर्धा व गाड्या पळविण्याची स्पर्धा अत्यंत प्रेक्षणीय असते.

सरकारी गणपती उत्सवाप्रमाणे नवरात्रातील त्रिपुरसुंदरीचा उत्सव व गावातील उमारामेश्वराचा शिवरात्रीचा पाच दिवसांचा रथोत्सव यामधील सर्व दरबारी लवाजमा व सरंजामासह निघणाऱ्या वैभवशाली मिरवणुकी डोळ्यांचे पारणे फेडणाऱ्या असत.

दिवाळीत किल्ल्यांचे प्रदर्शनाची सुरवात येथील तैनातदार कै. नानासाहेब जोशी यांच्या वाड्यात त्यांच्या कलाप्रिय चिरंजीवांनी पन्नासहून अधिक वर्षांपूर्वी सुरू केली. त्यांच्या किल्ल्यांच्या सजावटीची सर जमखंडीतील दुसऱ्या कोणत्याच किल्ल्यांच्या प्रदर्शनास कधीच आली नाही. त्यांच्या वाड्यात शाहूनगरवासी मंडळीचे नाट्यप्रयोगही झाले. तसेच प्रसिद्ध राष्ट्रीय कीर्तनकार डॉ. दत्तोपंत पटवर्धन यांची सुरवातीची कीर्तनेही झाली. मागील पिढीला माहीत असलेले प्रख्यात जादूगार प्रो. एल. के. शहा यांचे अद्‌भुत जादूचे प्रयोगही यांच्याच वाड्यात झाले.

युवकांना लाठी, बोथाटी, लेजीम वगैरे सांघिक व वैयक्तिक मर्दानी खेळांचे शिक्षण पूर्वीपासून सर्वत्र देण्यात येत, असे तसे जमखंडीसही दिले जाई. पण लाठीचे हात जमखंडीस श्री. गोपाळराव जोशी, सुभेदार यांनी काही विशेष प्रकारचे बसविले होते. त्यांची उपयुक्तता त्यांनी बाहेरगावीही पटवून देण्याचा प्रयत्न केला होता. आता सर्वत्र जे हात शिकविले जातात, त्याखेरीज जमखंडीचे हे विशेष प्रकारही शिकून जतन करून ठेवण्याची प्रवृत्ती गेल्या पिढीपर्यंत होती.

प्रतिवर्षी आषाढ किंवा श्रावण महिन्यात एक शनिवार-रविवार जोडून गावातील मोठ्या मारुती मंदिराचा ओकळी महोत्सव परंपरागत रीतीने पार पडतो. त्यानिमित्त

रविवारी तिसरे प्रहरी चिंचेची खळ लावून निसरड्या केलेल्या उंचच उंच खांबावर पाण्याचे व रंगाचे माऱ्यात चढून यशस्वी होणाऱ्यास चांदीचे किंवा पूर्वी सोन्याचे कडे बक्षीस देऊन मिरवण्यात येई. या समारंभाचे अंग म्हणून शुक्रवार, शनिवार, रविवार व सोमवार रात्रभर पारिजातकाचे खेळ व लावण्या आणि पोवाड्यांचे कार्यक्रम कित्येक वर्षे अव्याहतपणे चालत आले आहेत. हा कार्यक्रम उघड्या रंगमंचावर उभा करून रात्रभर चालतो व प्रचंड समाज तन्मयतेने त्यांचे रसग्रहण करीत असतो.

महात्माजींचे हरिजनोद्धाराचे कार्य जमखंडीस अत्यंत एकनिष्ठपणे डॉ. हुल्याळकरांचे चिरंजीव श्री. विष्णुपंत तथा बाबुराव हुल्याळकर यांनी त्या वेळी चालविले होते. त्यांनी जमखंडी सरकार व विधिमंडळाचे सभासद यांचे लक्ष देवदासींच्या प्रश्नांकडे आणि शनिवारी पाणी मारून खेळायच्या ओकळीच्या वेळी हरिजन स्त्रियांची विटंबना होऊ नये, या बाबीकडे वेधून घेण्यासाठी उपोषण करून त्यासंबंधी कायदा करण्यास भाग पाडले.

प. भा. हायस्कूलचा सुवर्णमहोत्सव १९३८ मध्ये रँ. र. पु. परांजपे यांच्या अध्यक्षतेखाली साजरा झाला. १९४० त द. म. मराठी साहित्य संमेलनाचे दुसरे अधिवेशन जमखंडीस झाले. त्याचे अध्यक्ष वि. स. खांडेकर होते, तर स्वागताध्यक्ष श्री. ज. स. करंदीकर होते.

१९४३त दक्षिणी संस्थानांच्या प्रजापरिषदेचे अधिवेशन पं. सातवळेकर यांच्या अध्यक्षतेखाली जमखंडीस झाले. ते लो. ना. अणे यांच्या अध्यक्षतेखाली व्हावयाचे होते, पण ते येऊ शकले नाहीत.

अखिल कर्नाटक साहित्य संमेलनाचे अधिवेशनही जमखंडीस झाले आणि कन्नड साहित्यिक, कवी आणि कलाविदांचे विचार आणि कार्यक्रम ऐकावयास आणि पाहावयास मिळाले.

अभिनव नाट्यसमाज या स्थानिक मराठी हौशी कलाकारांच्या नाटक संस्थेने अनेक गद्य व संगीत मराठी नाटके बसवून त्यांचे प्रयोग यशस्वीपणे करून रसिकांकडून वाहवा मिळविली आहे. त्यात बापूराव साठे, तात्यासाहेब घोरपडे, बंडोपंत घारे, डॉ. वाटवे, डॉ. परांजपे, गोपाळराव सोमण, हरकंगी प्रभृतिंची कामे कोणासही आठवल्याखेरीज राहणार नाहीत.

मल्लिकार्जुन नाट्य ॲमेच्युअर्स या कानडी हौशी कलाकारांच्या नाट्यसंस्थेनेही डॉ. ए. टी. पाटील यांच्या दिग्दर्शनाखाली अनेक दर्जेदार कानडी गद्य व संगीत नाटके बसवून त्यांचे प्रयोग यशस्वी करून दाखवले आहेत. श्री. शिवलिंगय्या गुडली, टी. गुरण्णा प्रभृति अनेक नटांची नावे कोणासही सहज आठवतील. या खेरीज या संस्थेने आपल्या वाढदिवस समारंभानिमित्त कित्येक वर्षे नामांकित गायक–गायिकांचे कार्यक्रम ठेवून जनतेला अपूर्व संगीत श्रवणाचा लाभ मिळवून दिला आहे.

श्री. शंकर कडपट्टी व वसंतराव कुलकर्णी (आलबाळ) यांनी कानडी नाटके

रचून ती आपल्या सहकाऱ्यांमार्फत रंगभूमीवर आणून यशस्वी करून दाखविली आहेत. श्री. श्रीराम वालावलकर यांनी 'पैसा मिळवायचाय मला' हे नाटक रचून त्याचा प्रयोगही यशस्वी करून दाखविला आहे.

गरीब विद्यार्थ्यांच्या राहण्याजेवण्याची सोय 'श्री. काडसिद्धेश्वर बोर्डिंग' ही संस्था स्थापून श्री मल्लिकार्जुन देवालयाजवळ श्री. चिक्कय्यास्वामी ह्यानी श्री. मल्लप्पाकटगी व रामलिंगप्पा पट्टण यांच्या सहकार्याने व्यापारी वर्गाचे सहाय्य घेऊन काही वर्षे उत्तम प्रकारे केली होती. श्री. चिक्कय्यास्वामी यांच्या निधनानंतर ती बंद पडली.

महिला वर्गात अक्कन बळग आणि वनितामंडळ या दोन संस्था आपल्या शक्तीप्रमाणे कित्येक वर्षे सांस्कृतिक कार्य करीत आहेत. खेळ, नाटके, पाठांतर स्पर्धा, हस्तलिखित मासिक आणि राष्ट्रीय दिन साजरे करणे एवढ्यापुरते त्यांचे कार्य मर्यादित आहे.

प्रजापरिषदेच्या चळवळीच्या अनुषंगाने राजकीय विचार जागृतीच्या दृष्टीने अनेक मोठमोठ्या राजकीय पुढाऱ्यांच्या मोठमोठ्या सभा होऊन गेल्या आहेत. संस्थान असता वेळेपासून आजपर्यंत हा ओघ तसाच चालू आहे. त्यात कै. गंगाधरराव देशपांडे, शंकरराव देव, काकासाहेब गाडगीळ, सेनापती बापट, साने गुरुजी, एस. एम. जोशी, अण्णूगुरूजी, दादासाहेब मावळणकर, जयंतराव टिळक एवढेच काय पण डॉ. पट्टाभिसीतारामय्या, मोरारजी देसाई, पं. जवाहरलाल नेहरू व इंदिरा गांधी यांचीही जमखंडीस भेट झाली आहे.

प्रजापरिषदेतील नव्या युवक मंडळींनी श्री. गुंडोपंत बर्वे (बी. गुंडप्पा) यांच्या नेतृत्वाखाली हमाल मंडळ, गुमास्तामंडळ वगैरे छोटीछोटी मंडळे स्थापून रयतसंघटना उभी करून स्वत:च्या बळावर स्वतंत्र रयत परिषद आयोजून यशस्वीपणे पार पाडली होती. त्याचे उद्घाटक म्हणून हैद्राबाद स्टेट काँग्रेसचे नेते श्री. रामानंदस्वामी हे आले होते, तर अध्यक्ष म्हणून कोल्हापूरचे श्री. माधवराव बागल आले होते. गुंडोपंत बर्वे यांच्या आकस्मिक निधनाने या गटाची प्रगती होऊ शकली नाही.

याच संदर्भात जमखंडी येथील गोरक्षण संस्थेने कित्येक वर्षे गोरक्षणाचे केलेले कार्य तसेच वेदआन्हिक पाठशालेचे कार्य विसरून चालणार नाही. या गोरक्षणाच्या चळवळीच्या संदर्भात बाहेरच्या प्रचारकांनी कीर्तनाखेरीज मॅजिक लँटर्नच्या स्लाइडसद्वारा केलेला प्रचार त्या वेळी नवा व कुतूहलजनक वाटला.

प्रजाप्रबोधनाच्या सामाजिक व नैतिक अंगाच्या दृष्टीने संस्थानाच्या राजवटीत डॉ. पटवर्धनबुवांची कीर्तने, त्यांनी चालविलेले नमस्काराचे वर्ग, तसेच मसूरच्या ब्रह्मचर्याश्रमाच्या मंडळींनी कीर्तन, प्रवचनद्वारा केलेली धर्मजागृती आणि नमस्कार व आसनांच्या द्वारा व्यायाम व आरोग्याचा प्रचार, पं. तांबेशास्त्री, तोफखानेशास्त्री यांची, तसेच पं. दशपुत्रेशास्त्री यांची धर्म व संस्कृतीबद्दल जागृती घडविणारी प्रवचने यांचा उल्लेख करावा लागेल. विलिनीकरणानंतर गदगचे स्वामी दिवंगत मल्लिकार्जुन स्वामी यांची अनेक वेळा अनेकानेक झालेली प्रवचने, कूडली मठाच्या शंकराचार्यांची

प्रवचनमालिका, पं. विष्णुजी क्षीरसागर यांची धर्मजागृतीपर प्रवचने यांचे कार्य मोलाचे आहे.

१९६० सालापासून श्री. गुरुदेव रानडे परमार्थ मंदिरामार्फत अनेक परस्थळच्या अधिकारी प्रवचनकारांची पारमार्थिक प्रवचने दरसाल श्रावण व पौषमास या महिन्यांत आणि ३ जुलै या गुरुदेवांच्या जयंतीच्या प्रसंगी होणाऱ्या सप्ताहानिमित्त होत असतात. त्याचेही शैक्षणिक मूल्य कमी नाही.

अलीकडे काही वर्षे रोटरी क्लब व लायन्स क्लब यांच्या शाखा जमखंडीस सुरू झाल्यापासून नेत्रयज्ञ, दंतयज्ञ वगैरेसारखे अनेक लोकोपयोगी कार्यक्रम ते हाती घेऊन पार पाडीत असतात. कायद्याचे द्वारा जगातील शांतता या आंतरराष्ट्रीय संस्थेचे कार्य श्री. तातासाहेब बंगी वकील येथे पार पाडीत असतात.

या खेरीज सार्वजनिक ज्ञानपीठ (सार्वजनिक सभेसाठी व्यासपीठ) या नावाचा एक निधी येथे असून, त्याचे एक विश्वस्त तातासाहेब बंगी हेच आहेत. इंग्रजी, हिंदी किंवा कानडी भाषेतून विद्वान व्याख्यात्यांची सामाजिक, धार्मिक, आर्थिक, राजकीय समस्यांवर अभ्यासपूर्ण व मार्गदर्शक अशी व्याख्याने या निधिद्वारा होत असतात.

याप्रमाणे समाज प्रबोधन आणि सांस्कृतिक कार्याच्या जमखंडीत झालेल्या आणि चाललेल्या घडामोडी पाहिल्या, तर सर्वत्र चाललेल्या किंवा होऊन गेलेल्या नव्याजुन्या घटनांचे पडसाद जमखंडीतही उठले आहेत हेच दिसते.

## समारोप

मागच्या परिच्छेदात समाज प्रबोधनाच्या कार्याचा आढावा घेताना पत्रकारितेचा उल्लेख राहून गेला आहे. कै. रामचंद्रराव आप्पासाहेबांनी त्याचे महत्त्व जाणून 'परशु' नावाचे वर्तमानपत्र सुरू केले होते, याचा उल्लेख येऊन गेला आहे. त्यानंतर 'संस्थानी स्वराज्य' जमखंडीस आणण्यात आले याचीही माहिती आली आहेच. ते पत्र १९४४ ते १९४७ पर्यंत चालले. त्यानंतर १५-८-१९४७ ते ८-३-४८ पर्यंत श्री. गाडगीळ व श्री. बी. डी. जत्ती यांनी 'जय-हिंद' साप्ताहिक अनुक्रमे मराठी व कानडीत चालविले. 'संस्थानी-स्वराज्य' चालू असता श्री. काखंडकी यांनी कानडी 'निर्भय' साप्ताहिक काढले होते व श्री. रानडे यांनीही 'जमखंडी-समाचार'चे काही अंक काढले होते. पुढे २६-१-५९ ते १९७५ पर्यंत 'नवहिंद' हे द्विभाषिक साप्ताहिक प्रथम श्री. बोरगलकर व सावंत यांनी व मग श्री. शामराव वाटवे व श्री. टी. एम. देशपांडे यांनी चालविले. त्यांचे मालकत्व श्री. पोंक्षे यांनी केले. १९७३ च्या सुमारास श्री. एम. सी. गोंदी यांनी 'विक्रांत भारत' व श्री. बाबूरेड्डी तुंगळ यांनी 'कुरूक्षेत्र' ही दोन कानडी साप्ताहिके काढली व ती आजवर चालू आहेत. यानंतर हिंदी व कानडीत 'जुगुनू' हे श्री. नदाफ व 'जनमतरंग' हे कन्नड साप्ताहिक श्री.

बहिरशेट्टी यांनी चालविले आहे. आणखीही काही साप्ताहिके चालू आहेत.

जमखंडी संस्थानाची काही वैशिष्ट्ये होती. पहिले वैशिष्ट्य प्राथमिक, माध्यमिक आणि उच्च असे सर्व शिक्षण सर्वांना मोफत होते. दुसरे वैशिष्ट्य म्हणजे अत्यंत गरीब अशा पन्नास विद्यार्थ्यांना सरकारी वाड्यातून दोन वेळा पोटभर अन्न मिळेल एवढी दररोज एकवेळ माधुकरी मिळण्याची सोय. या सोयीचा फायदा घेऊन कित्येक गरीब विद्यार्थी बिनखर्चाने विद्या संपादन करून नावारूपास चढले. १९३८ मध्ये हायस्कूलचा सुवर्णमहोत्सव झाला. त्या वेळी असे काही विद्यार्थी त्यात सहभागी होण्यासाठी आले असता त्यांनी त्या माधुकरीच्या जागेत जाऊन तेथील चुलीला साष्टांग नमस्कार घालून आपली कृतज्ञता व्यक्त केली असे म्हणतात. विलिनीकरणाने ही दोन्ही वैशिष्ट्ये कायमची नाहीशी झाली आहेत.

जमखंडी संस्थानाची स्वत:ची राजमुद्रा व राजगीत होते. दरबारच्या वेळी मानवंदनेसारख्या प्रसंगी ते संस्थानी बँडवर मोठ्या थाटात वाजवले जाई. त्या पदाची आरंभीची ओळ 'दे विजय हरि सतत पटवर्धना। पालक जमखंडि अधिपति.' जमखंडी दरबारच्या पोषाखात श्रीमंत शंकरराव आप्पासाहेबांनी पगडीला विशेष स्थान दिले होते. दरबारसाठी प्रथम दर्जाच्या अधिकाऱ्यांना काळा-जांभळा बंद गळ्याचा कोट व पगडी आणि जरीचे उपरणे; तर सरकारी रथोत्सवासाठी रेशमी पिवळे बंद गळ्याचे कोट व पगडी आणि उपरणे असा पोषाख ठरलेला असायचा. गव्हर्नर साहेबांच्या भेटीचे वेळी दरबारचा पोषाख व पांढरी सूट-पँट आणि बूट असा फरक असायचा. क्लबच्या कार्यक्रमासाठी तांबड्या रंगाचे कोट कॉलरचे असायचे. पहिल्या दर्जाच्या अधिकाऱ्यांना राजेसाहेबांनी मोटारीही दिल्या. अशी एक प्रकारची शिस्त आणि शोभा त्यांनी सरकारी समारंभात निर्माण केली होती.

विशेष उल्लेखनीय गोष्ट म्हणजे संस्थान मजकुरी सब रजिस्ट्रारचे जागेवर काम करणारे बहुतेक अधिकारी लाचलुचपतीपासून अलिप्त असणारे असे होते, असा त्यांचा लौकिक आहे. आज लाचलुचपतीबाबत सर्वत्रच जो मोठ्या प्रमाणावर बोभाटा ऐकू येतो तो पाहिला, तर एकंदरच जमखंडीचा राज्यकारभार पुष्कळच सोज्वळ होता असे म्हणावे लागेल.

काय होते-काय झाले? कशासाठी धडपड केली आणि पदरी काय पडले? या काँग्रेस शताब्दीच्या वर्षात सर्व देशापुढेच उभे असलेले आणि प्रत्येकाला चक्रावून टाकणारे हे प्रश्न आहेत. जमखंडी किंवा कोणत्याही एका भागाने विचार करण्यासारखा वेगळेपणा त्यात काही नाही, हेच विलिनीकरणाचे प्रत्यंतर!!



# ऐका महिमा काँग्रेसचा (पोवाडा)

(शाहीर म. द. खाडिलकर, जमखंडी)

भीति दरारा पर-सत्तेचा तुडवुनि आत्मोद्धाराचा।
मार्ग दाविला भारतदेशा ऐका महिमा काँग्रेसचा।।धृ।।

चौक १ ला

साल आठराशे पंचाऐंशी डिसेंबर अठ्ठावीस। जन्म जाहला मुंबई नगरी पहिली सभा ग्रँटरोडास।। पुण्य मिळाले कल्पकतेचे ह्यूम साहेबाला साचे। डफरिन साहेब तयार झाला आशीर्वाद देण्या वाचे।। न्यायमूर्ती रानडे, गोखले, दादाभाई नौरोजी। फिरोझ मेथा, लाल, बाल आणि पाल, सुरेंद्र बॅनर्जी।। मालवीय आणि बेझंट बाई, मोतीलाल, शास्त्रीहि तसे। पंडित मुत्सद्दी नामांकित तिला पुढारी मिळती असे।।चाल।। प्रतिवर्षी गावोगावाला। सकळही घेति सभेला।। भाषणांनी जागोजागेला। जागृत करिति लोकाला। जनतेच्या अडचणी साऱ्या। समजाविति सरकारला।।चाल।। पण दिला देशभक्तीचा मंत्र जनतेला।। मागण्यांच्या पाठिशी उभे करा शक्तीला।। सारे भेद विसरूनी राखा सदा ऐक्याला।। शिकवण अशी द्यावया साऱ्या जनतेला।। देशाच्या साऱ्या भागांतून। झाले पुढे लोक विद्वान। साऱ्या जाती धर्मामधून। किती आले लोक सुजाण। काँग्रेसचे धरून निशाण। हळुहळु वाढु लागला देश अभिमान।। राष्ट्रीय शिक्षणाची जाण। लोकमान्य करिति निर्माण। नको परदेशाकर्षण। त्यावर बहिष्कार पूर्ण। घालून ध्येय स्वराज्य साधा त्वरेनं।। असा प्रचार चालला जोमानं। जागतिक पहिल्या युद्धानं। इंग्रजांना केलं बेचैन। स्वराज्य हप्त्याहप्त्यानं। देण्याचं दिलं वचन। राखीव-सोपीव हक्कांचं सुधारणा दान।। जाहीर केलं सरकारनं। पण इकडं रौलट कायद्यानं घातलं थैमान।। जालियनवालाबाग पुढे पेटे प्रकरण।। न्यायाचा बुरखा आंग्लाईचा गेला गळून।।चाल।। निर्दय उघडा क्रूर नागडा नाच बघुन सैतानाचा। तसाच अभिनव मार्ग दाखवी ऐका महिमा काँग्रेसचा।।१।।